
नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**

एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका


महाराष्ट्र साहित्य पत्रिका
संपादक - श्री ह. ल. निपुणगे
अंक - २८५ - एप्रिल - जून १९९८
" - २८६ - जुलै - सप्टेंबर ९८
" - २८७ - ऑक्टोबर - डिसेंबर ९८
(दिवाळी अंक १९९८)

अनुक्रमणिका

१९९८

महाराष्ट्र साहित्य पत्रिका

(१) अंक २८५ – एप्रिल – मे – जून १९९८
संपादक – श्री. ह. ल. निपुणगे

(२) अंक २८६ – जुलै – ऑगस्ट – सप्टेंबर १९९८

(३) अंक २८७ – ऑक्टोबर – नोव्हेंबर – डिसेंबर १९९८
(दशकातील कथाकार विशेषांक)
दिवाळी अंक १९९८

अनुक्रमणिका

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

एप्रिल, मे, जून १९९८

श्री. राजेंद्र बनहट्टी, अध्यक्ष, म.सा.प. पुणे एकसष्टीनिमित्त प्रा.ग.प्र. प्रधान यांचे हस्ते स



अनुक्रमणिका

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक २८५ - एप्रिल-मे-जून १९९८

□

संपादक
ह. ल. निपुणगे

□

**संपादन समिती**
राजा फडणीस (प्र. कार्यवाह)
प्रा. श्रीराम पुजारी
डॉ. वि. भा. देशपांडे
डॉ. ल. रा. नसिराबादकर
डॉ. अंजली सोमण
प्रकाश होळकर

□

महाराष्ट्र साहित्य परिषद
टिळक रोड,
पुणे ४११ ०३०.
दूरध्वनी : ४७५९६३

अनुक्रमणिका

# अनुक्रमणिका





मुद्रक-प्रकाशक : राजा फडणीस, प्रमुख कार्यवाह, महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रोड, पुणे ४११ ०३०.
मुद्रणस्थळ : जंगम ऑफसेट, प्रा. लि., २५/१०, नांदेड फाटा, पुणे ४११ ०४१.
मुखपृष्ठ रचना : स. म. जंगम
संगणकीय अक्षरजुळणी : यशश्री एंटरप्रायजेस, कोथरूड, पुणे ४११ ०२९.
मूल्य : रुपये तीस ◻ वार्षिक वर्गणी संस्थांसाठी : शंभर रुपये.
आजीव सदस्य शुल्क : रु. ५००/- ◻ वार्षिक सदस्य शुल्क : रु. ५०/-
अंक २८४-२८५ जानेवारी ते जून १९९८
महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाने या नियतकालिकाला अनुदान दिले आहे.

# संपादकीय

ह. ल. निपुणगे

---

महाराष्ट्र साहित्य पत्रिकेचा अंक क्र. २८४-२८५ असा जोड अंक पाहून वाचकांना २८४ (जाने.-फेब्रु-मार्च) हा अंक का प्रसिद्ध झाला नाही, असे वाटणे साहजिक आहे. म.सा.प. चा अंक क्र. २८३ (दिवाळी अंक) नोव्हेंबरमध्ये प्रकाशित झाला. त्यानंतरचा म्हणजे अंक क्र. २८४ (जाने.-फेब्रु.-मार्च) असा अंक साधारणपणे फेब्रु.-मार्चमध्ये प्रकाशित होऊन वाचकांच्या हाती पडावयास हवा होता. परंतु ९ जानेवारीपासून म.सा.प.च्या निवडणुकीची अधिसूचना आली. तो निवडणुकीचा कालावधी १५ मार्च ९८ पर्यंत होता हे सर्व सभासदांच्या ध्यानात असेलच. त्यामुळे निवडणुकीच्या कालावधीत माझ्या संपादनाखालील अंक वाचकांच्या हाती पडणे मला योग्य वाटले नाही. कारण मीही पत्रिकासंपादकपदासाठी एक उमेदवार होतो. तरीही १५ मार्चनंतर त्वरा करून ३१ मार्चपूर्वी जाने.-फेब्रु.-मार्च अंक पोस्टाच्या नियमाप्रमाणे त्या विशिष्ट कालावधीमध्ये रवाना करण्याचा मानस होता. पण निवडणुकीनंतर माझी प्रकृती काही दिवस बरी नव्हती. त्यामुळे मी काम करू शकलो नाही. या सर्व अडचणींचा विचार करून म.सा.परिषदेचे सभासद मला क्षमा करतील असा विश्वास आहे.

या अंकाच्या संपादनातील माझ्या भूमिकेविषयी थोडेसे लिहायला हवे. श्री. राजेंद्र बनहट्टी यांनी १४ जानेवारी ९८ ला ६१ व्या वर्षात पदार्पण केले. त्यांचे हार्दिक अभिनंदन! कथालेखक म्हणून वाचकांना त्यांचे नाव सुपरिचित आहे. त्यांचे दीर्घकथा व लघुकथा मिळून सुमारे बारा कथासंग्रह प्रकाशित झाले आहेत. त्यांच्या निवडक दीर्घकथा व लघुकथा यांचे दोन संपादित संग्रहही नुकतेच प्रकाशित झाले आहेत. त्यांच्या कथांची वैशिष्ट्ये सांगणारा विस्तृत लेख डॉ. ललिता कुंभोजकर यांनी लिहिला आहे. हा लेख देण्याचा हेतू एवढाच की या निमित्ताने त्यांच्या लेखनाची भरीव नोंद व्हावी. वाचक याच्याशी सहमत होतील असे वाटते.

डॉ. सदानंद मोरे यांच्या 'तुकाराम दर्शन' या ग्रंथाने गतवर्षात पारितोषिकांचा विक्रम केला आहे. त्यांना महाराष्ट्र फौंडेशनपासून महाराष्ट्र साहित्य परिषदेपर्यंत अनेक महत्त्वपूर्ण पारितोषिके-पुरस्कार यांचा लाभ होऊन त्यांचा सुयोग्य गौरव झाला आहे. त्यांच्या एकूणच लेखनकार्याचा आणि विशेषतः 'तुकाराम दर्शन' या ग्रंथाचा वाचकांना परिचय व्हावा आणि ज्यांनी हा ग्रंथ आणि त्यांचे साहित्य वाचले नसेल त्यांना ते वाचावे असे वाटावे या हेतूने प्रा. दिलीप धोंडगे यांनी लिहिलेला लेख या अंकात दिला आहे. या लेखात 'तुकाराम दर्शन' या ग्रंथातील निवडक अवतरणेही मुद्दाम दिली आहेत. ती वाचून ग्रंथाची वैशिष्ट्ये वाचकांच्या ध्यानात यावीत.

डॉ. द. न. गोखले यांच्या 'गांधीजी — महामानव' या ग्रंथावरील विस्तृत समीक्षणात्मक लेख



अनुक्रमणिका






डॉ. वि. रा. करंदीकर यांनी सप्टेंबर ९७ च्या अंकात लिहिला होता. तो अनेकांना खूपच आवडला. या लेखातील 'डॉ. वि. रा. करंदीकर यांच्या काही आक्षेपांना डॉ. द. न. गोखले यांनी केलेला खुलासा' हा विस्तृत लेख याच अंकात प्रसिद्ध झाला आहे. तो डॉ. वि. रा. करंदीकर यांना काही म्हणावयाचे असल्यास अवश्य म्हणावे असे सांगून त्यांना दाखविला. त्यांनी थोडक्यात केलेला खुलासाही याच लेखाच्या शेवटी दिला आहे. डॉ. द. न. गोखले यांच्या ग्रंथालाही म.सा.प. पुरस्कार, महाराष्ट्र राज्य पुरस्कार मिळाले आहेत.

म.सा.पत्रिकेच्या अंकात अशा प्रकारचे पुस्तकांसंबंधी सर्व काही सांगणारे असे वेगळे लेख देण्याच्या धोरणामागे चांगले लेखक आणि त्यांचे लेखन सभासदांना माहीत व्हावे हाच आहे. अनेक महाविद्यालयामध्ये आणि ग्रंथालयामध्येही हा अंक जातो यातील लेख वाचून विशिष्ट लेखक आणि त्याचे लेखन जास्तीत जास्त वाचले जावे, त्याचा प्रसार व्हावा; एकाने दुसऱ्यास चांगली पुस्तके वाचण्यास सुचवावे आणि चांगल्या साहित्याचे वाचक वाढावेत असा आहे.

पत्रिकेच्या अंकात फक्त पुस्तकांचा परिचय यावा असा हेतू न ठेवता काही निवडक पुस्तकांवर विस्तृत लेख यावेत त्यावर चर्चा व्हावी हे अधिक योग्य वाटते. वाचकांनाही अशा काही लेखकांची त्यांनी वाचलेल्या चांगल्या ग्रंथांची नावे अशा प्रकारच्या लेखनासाठी अवश्य सुचवावीत. त्याचाही विचार करता येईल.

गतवर्षीच्या जून अंकात दिवाळी अंकातून प्रसिद्ध होणाऱ्या निवडक ललितेतर लेखांची सूची दिली होती. त्याबद्दल वाचकांच्या चांगल्या प्रतिक्रिया आल्या. यंदाही १९९७ च्या दिवाळी अंकातील निवडक लेखांची सूची दिली आहे.

वाचकांना या सूचीचा उपयोग होईल. विशेषत: व्याख्याने ठरविताना कोणता लेखक कोणत्या विषयावर बोलू शकतो याचे मार्गदर्शन या सूचीमुळे निश्चित होईल असे वाटते.

एकूणच माझी संपादकीय भूमिका अंक सर्वांना आवडावा, तो जास्तीतजास्त वाचला जावा आणि साहित्याच्या आणि वाचकांच्याही उत्कर्षाला हातभार लागावा अशी आहे.

अंकाच्या संपादनासंबंधी वाचकांच्या सूचना हव्या आहेत. वाचकांनी काही चांगले विषय सुचवावेत. योग्य वाटतील त्या विषयासंबंधी विचार करणे शक्य आहे. अंकासंबंधीच्या सर्व प्रकारच्या सूचनांचे मी स्वागतच करीन.

महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या मतदारांनी मला पत्रिकेच्या संपादकपदासाठी तीन वर्षांसाठी निवडून दिले आहे. त्यांचा मी अत्यंत आभारी आहेच. माझ्या परीने मी चांगले संपादन करण्याचा प्रयत्न नक्कीच करीन. माझ्याकडूनही काही चुका होऊ शकतात. अशावेळी आपणच मला उदार मनाने सांभाळून घ्यावयाचे आहे. आपल्या बहुमोल सहकार्यावरच माझे संपादक म्हणून मिळणारे यश अवलंबून आहे. आपल्या सर्वांच्या शुभेच्छा मला हव्या आहेत.

□

# ‘जीवनानुभवाचा खोल गाभा !’

डॉ. ललिता कुंभोजकर

राजेंद्र बनहट्टी हे मराठीतील श्रेष्ठ दर्जाचे कथाकार आहेत. त्यांच्या दहा कथासंग्रहांनी मराठी कथासाहित्यावर त्यांच्या लेखनवैशिष्ट्यांची आणि त्यांच्या प्रतिभेची स्वतंत्र नाममुद्रा उमटविलेली आहे. १९७१ मध्ये त्यांचा ‘समानधर्मा’ हा पहिला कथासंग्रह प्रसिद्ध झाला. येथपासून ते १९९४ मध्ये प्रसिद्ध झालेल्या त्यांच्या ‘प्रेक्षक’ आणि ‘मध्यंतर’ पर्यंतच्या दहा कथासंग्रहांचा विचार केला तर त्यांच्या कथेने उत्तरार्धात अधिक विलोभनीय रूपे धारण केलेली आहेत असे दिसते. प्रत्येक लेखकाचा संवेदनस्वभाव हा भिन्न भिन्न असतो. त्याची जडणघडण स्वतंत्र रीतीने झालेली असते. या संवेदन स्वभावधर्मानुसार लेखकाची कथा अवतीभोवतीच्या अनुभवातून आकार घेत असते. त्यातील जीवनधर्म शोधीत असते. हा जीवनधर्म शोधण्याची ताकद त्या कथेला तिचे असे स्वतंत्र रूप प्राप्त करून देत असते. राजेंद्र बनहट्टी यांच्या कथासंसाराकडे पाहिले तर असे वाटते, की एखादा सुंदर फुलांनी बहरलेला, रसरसलेला असा हा देखणा वृक्ष आहे. त्याने त्याचे रूप जीवनाच्या गाभ्यातून उचललेले आहे. त्याची मुळं, त्याचा भागा जीवनाच्या फार सूक्ष्म अशा तळापर्यंत जाऊन पोहोचलेला आहे. जीवनाचा रस, गंध ह्या देखण्या कथावृक्षाला लाभलेला आहे. ज्या जीवितमूल्यातून, संस्कारांमधून, वातावरणातून, श्रद्धास्थानांमधून राजेंद्र बनहट्टी यांची जडणघडण झाली, त्याचे स्वच्छ, नितळ असे प्रतिबिंब त्यांच्या कथांमधून उमटलेले आहे. घटनाप्रधान, व्यक्तिप्रधान असलेल्या त्यांच्या कथेने मनुष्यस्वभावातले नुसते बारकावे टिपलेले नाहीत,. तर या अथांग जीवनप्रवाहात अतिशय गुंतागुंतीचे, संमिश्र, भावपूर्ण जीवन जगत असणाऱ्या व्यक्तींच्या अंतरंगाचे असणारे विविध पदर त्यांनी उलगडलेले आहेत. या व्यक्तीचा शोध-वेध घेण्याचा प्रयत्न बनहट्टी यांनी कथालेखनामधून केलेला आहे. त्यांच्या वर्तनातून, बोलण्यातून, वावरण्यातून दिसणाऱ्या रूपापलीकडे असणाऱ्या त्यांच्या अंत:स्थ वृत्ती त्यांनी कथेतून चित्रित केलेल्या आहेत. मानवी आयुष्यातील एकाकीपणा, नात्यानात्यातले भावबंध, त्यातील गुंतागुंत, मानवी मनाची अनाकलनीयता आणि गूढता राजेंद्र बनहट्टी यांच्या कथांमधून साकार झाली आहे. जीवनाविषयीचे एक सतत कुतूहल हा त्यांच्या कथेचा आधार आहे म्हणून अगदी प्रारंभीच्या काळातीलही त्यांची कथा ही चैतन्यपूर्ण आहे. त्यामध्ये विविधता आहे. दैनंदिन जीवन जगत असताना कुटुंबातील विविध नात्यांमध्ये स्त्री-पुरुषांना भोगावी लागणारी सुखे-दु:खे यात आहेत. सहवासात आलेल्या विविध स्तरावरच्या आणि विविध नात्यांनी आलेल्या व्यक्ती, तर कधी कुठल्याही नात्याच्या नामाभिधानात ज्याला बांधता येणार नाही अशा नात्यापलीकडील व्यक्ती यांच्या विषयीच्या आस्थेतून राजेंद्र बनहट्टी यांच्या कथेत विविधता आलेली आहे. कथेच्या विषयात केवळ वैविध्याच्या दृष्टीने, आशयाच्या दृष्टीने नाविन्य आणण्यासाठी त्यांची कथा कृत्रिम चित्रे रेखाटत नाही.

राजेंद्र श्रीनिवास बनहट्टी
१४ जानेवारी १९३८, नागपूर
एम. ए. (इंग्रजी) नागपूर विद्यापीठ, एम्.ए (मानसशास्त्र) पुणे विद्यापीठ
'समानधर्मा' १२८-२/२५ कोथरूड, पुणे ४११ ०२९.
संचालक, सुविचार प्रकाशन मंडळ,पुणे
संपादक 'रसिक' दिवाळी वार्षिक

**साहित्यसंस्थेतील पदे व सन्मान**

कार्याध्यक्ष, महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे (१९८५ ते ९२)
अध्यक्ष, अखिल भारतीय मराठी साहित्य महामंडळ (१९८८ ते ९२)
अध्यक्ष, महाराष्ट्र साहित्य परिषद (१९९५ ते ९८)
अध्यक्ष, साहित्यसभा, इंदूर शारदोत्सव व अमृत महोत्सव (१९९०)
अध्यक्ष, तिसरे कोथरूड उपनगर साहित्य संमेलन, पुणे (१९९५)

**साहित्य संपदा :**

**कादंबरी**

**अपूर्णा,** मॅजेस्टिक प्रकाशन, मुंबई, पहिली आवृत्ती: जानेवारी १९६५
**अखेरचे आत्मचरित्र,** पहिली आवृत्ती: ग्रंथाली, मुंबई, १९८२
दुसरी आवृत्ती : श्रीविशाखा प्रकाशन, पुणे, १९८६
तिसरी आवृत्ती : श्री विशाखा प्रकाशन, पुणे, १९९७
**मरणानंतरचे मरण,** विश्वमोहिनी प्रकाशन, पुणे, पहिली आवृत्ती: मार्च १९८५

**कथासंग्रह :**

**समानधर्मा,** इनामदार बंधू प्रकाशन, पुणे, पहिली आवृत्ती: सप्टेंबर १९७१
**खेळ,** इनामदार बंधू प्रकाशन, पुणे, पहिली आवृत्ती: ऑक्टोबर १९७५
**आंब्याची सावली,** इनामदार बंधू प्रकाशन, पुणे, पहिली आवृत्ती: मार्च १९७८
**गंगार्पण,** विश्वमोहिनी प्रकाशन, पुणे, पहिली आवृत्ती: डिसेंबर १९८४
**अवेळ,** श्री विशाखा प्रकाशन, पुणे, पहिली आवृत्ती: ऑगस्ट १९८५
**कृष्णजन्म,** श्री विशाखा प्रकाशन, पुणे, पहिली आवृत्ती: मार्च १९८८
दुसरी आवृत्ती : जुलै १९९०, तिसरी आवृत्ती: डिसेंबर १९९०
**लांडगा,** श्री विशाखा प्रकाशन, पुणे, पहिली आवृत्ती: फेब्रुवारी १९८९
सुविचार प्रकाशन मंडळ, पुणे, दुसरी आवृत्ती: जून १९९२
**युद्धपर्व,** सन पब्लिकेशन्स, पुणे, पहिली आवृत्ती: जानेवारी १९९२
**प्रेक्षक,** लाटकर प्रकाशन, पुणे, पहिली आवृत्ती: जानेवारी १९९४
**मध्यंतर,** सन पब्लिकेशन्स, पुणे, पहिली आवृत्ती: ऑगस्ट १९९४



अनुक्रमणिका

**राजेंद्र बनहट्टी यांच्या निवडक लघुकथा**
संपादक: श्रीराम शिधये, मॅजेस्टिक प्रकाशन, मुंबई, पहिली आवृत्ती : १४ जानेवारी १९९८
**राजेंद्र बनहट्टी यांच्या निवडक दीर्घकथा,**
संपादक : डॉ. विलास खोले, प्रतिमा प्रकाशन, पुणे, पहिली आवृत्ती: १४ जानेवारी १९९८
**प्रवासवर्णन**
**नवलाई,** सन पब्लिकेशन्स, पुणे, पहिली आवृत्ती: मार्च १९९५
**व्यक्तिरेखा**
**शंभूराव,** इनामदार बंधू प्रकाशन, पुणे, पहिली आवृत्ती: जानेवारी १९७६

## पारितोषिके व पुरस्कार :

**अखेरचे आत्मचरित्र,** महाराष्ट्र राज्य शासन सर्वोत्कृष्ट कादंबरी पुरस्कार १९८२
**गंगार्पण,** महाराष्ट्र राज्य शासन सर्वोत्कृष्ट कथासंग्रह पुरस्कार १९८४
**कृष्णजन्म,** महाराष्ट्र राज्य शासन सर्वोत्कृष्ट कथासंग्रह पुरस्कार १९८८
शंकर पाटील कथा पारितोषिक, महाराष्ट्र साहित्य परिषद पुणे १९८८
**लांडगा,** महाराष्ट्र राज्य शासन सर्वोत्कृष्ट कथासंग्रह पुरस्कार १९८९
आनंदीबाई शिर्के पारितोषिक, महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे १९८९
**मध्यंतर,** श्री. दा. पानवलकर पारितोषिक, पानवलकर स्मृति प्रतिष्ठान, सांगली १९९४

## अनुवाद

**अखेरचे आत्मचरित्र**
गुजराती : **आखरनी आत्मकथा,** शकुंतला मेहता, (१९८५)
रजिस्ट्रार श्री. ना.दा. ठाकरसी महिला विद्यापीठ, मुंबई ४०० ०२०.
हिन्दी : **अन्तिम आत्मकथा,** केशव प्रथमवाद (१९९०) विद्या प्रकाशन मंदिर,
नई दिल्ली ११०० ०२. (प्रथम 'धर्मयुग' मध्ये क्रमशः प्रकाशित).
इंग्रजी The Last Autobiography बाळ गाडगीळ (१९९६)
Harper colins, Pubishers, India Pvt. Ltd. New Delhi 110 002
The Last Autobiography Bal Gadgil
(The Illustrated Weekly of India Nov. 9-15, 1991)
**कृष्णजन्म** (कथासंग्रह) गुजराती : जया मेहता (१९९६)
इमेज पब्लिकेशन्स, अहमदाबाद व मुंबई ४०० ००२
**शेजारी** (कथा) **पडोसी,** चंद्रकांत बांदिवडेकर (१९८५)
भारतीय कहानियाँ, ज्ञानपीठ प्रकाशन, नई दिल्ली ११० ००३.
**खेळ** (कथा) The Play - Hema Hirlekar, Fenuiua
**सुरूवात** (कथा) The Beginning, Bal Gadgil,
The Illustrated Weekly of India.
**Editing :** A History of Modern Marathi Literature, Published by M.S.P., Pune.



अनुक्रमणिका










फडके, खांडेकर यांच्या कथालेखनाचा कालखंड १९५०च्या सुमारास संपलेला होता. जीवनवाद आणि कलावाद यांचे प्रतिनिधित्त्व करणारी त्यांची कथा मध्यमवर्गीयांची सुख-दु:खे, आशा-आकांक्षा त्यांचे प्रश्न आणि त्यांची स्वप्ने मांडणारी होती. फडके यांनी रूजू केलेल्या रंजकतेच्या आकर्षणाचा प्रभाव पुढील अनेक वर्षे कथाकारांवर वेगवेगळ्या पद्धतीने होता. तंत्रशुद्ध कथेची रचना, स्वभाव, व्यक्तिदर्शन, मनोव्यापार यांना अधिकाधिक महत्त्व देणारी फडके कालखंडानंतरची कथा वेगवेगळ्या अंगांनी समृद्ध झाली. हळवे वातावरण, तरल भावुक मनोवस्था, ठराविक पद्धतीनेच कथेचा शेवट झाला पाहिजे अशी असलेली सांकेतिकता या काळात कमी झाली. चिंतनशीलतेचे, प्रगल्भतेचे लेणे ल्यालेली वामनराव चोरघडे यांची कथा १९३५-४० च्या सुमारास लिहिली गेली. दुसऱ्या महायुद्धानंतर मानवी जीवनाचा बदललेला अर्थ आणि माणसाच्या एकूण अस्तित्त्वाचाच प्रश्न गंगाधर गाडगीळ यांच्या कथेने उभा केला. नव्या वैचारिक आणि वाङ्मयीन जाणिवा निर्माण केल्या. गाडगीळ, गोखले, भावे, माडगूळकर इत्यादींनी लिहिलेल्या कथेमुळे मराठी कथेचे अंतरंग बदलले. मानवी स्वभावातील प्रवृत्ती, मनातील अंत:प्रवाहांचे दर्शन आणि जाणीवपूर्वक दिसल्या जाणाऱ्या मनाच्या पलिकडे असलेले अबोध मन उलगडण्याचा प्रयत्न नवकथेने केला. मनोविश्लेषण हे या काळातील कथेचे एक अंग बनले. किंवहुना एखादी कथा म्हणजे एखादे उत्तम व्यक्तिचित्र, एखाद्या क्षणीची मनाची टिपलेली भावावस्था, उत्तम काव्यगुण असलेले उत्कट भावपूर्ण निवेदन अशा प्रकारची कितीतरी नवी रूपे मराठी नवकथेने धारण केली. ही रूपे तिच्या नवीन भाषेसह अवतरली. प्रतिभेला अनन्यसाधारण महत्त्व आले. संवेदना, भावना, विचार यांच्या संदर्भातून लेखकाने घेतलेल्या अनुभवाचे नुसते वर्णन नवकथेत न येता, आशयाशी सुसंगत अशा अर्थपूर्ण प्रतिमांमधून नवकथा अधिक अर्थगर्भ आणि एकात्म बनली. नवकथेचा किंवा तद्नंतरच्या काळातील मराठी कथेचा इतिहास बघणे हा हेतू इथे नाही. त्यामुळे समग्र परिवर्तनाची वैशिष्ट्ये न पाहता, मराठी कथेत कोणते बदल झाले हे धावत्या रीतीने येथे पाहिलेले आहे. १९५०-६० नंतरची जी मराठी कथा आहे, त्याही कथेत वेगवेगळ्या जाणिवांनी समृद्ध झालेल्या कथांचे भिन्न भिन्न प्रवाह दिसतात. दुसऱ्या महायुद्धानंतर आलेली अस्तित्त्ववादी विचारसरणी असलेला मराठी कथेचा लहानसा प्रवाह सोडला तर काही प्रमाणात नवकथेच्या वैशिष्ट्यांनी समांतर अशी लिहिली गेलेली सदानंद रेगे, ज्ञानेश्वर नाडकर्णी यांची कथा दिसते. नवकथेत शिरू पाहणाऱ्या तंत्रबद्धतेच्या मर्यादा टाकून, नव्यातील 'चांगले' ते उचलून नव्या जुन्याचा समन्वय साधणारी



अनुक्रमणिका



शांताराम, दि. बा. मोकाशी इत्यादी अनेक कथाकारांनी लिहिलेली कथा ही मराठी नवकथेची वाटचाल संपन्न करीत गेलेली आहे. १९५०-६० नंतरच्या कालखंडात दलित कथा, स्त्रीवादी कथा, किंवा घटनाप्रधान अंगाने जाणारीही कथा निर्माण झालेली दिसते. या सर्व प्रवाहामध्ये स्त्रियांनी लिहिलेल्या कथालेखनाची वैशिष्ट्ये ही आशय आणि अभिव्यक्ती या दोन्ही दृष्टींनी वेगळी परिणाम मूल्ये प्राप्त करवून देणारी आहेत.

१९६० नंतरच्या काळात निर्माण झालेली, जवळ जवळ पुढे तीस पस्तीस वर्षे लिहिली गेलेली राजेंद्र बनहट्टी यांची कथा वर उल्लेखिलेल्या मराठी कथेच्या प्रवाहात स्वत:चे रूप कसे घेते, हे पाहाण्याचा येथे प्रयत्न केलेला आहे. 'समानधर्मा' (१९७१), 'खेळ' (१९७५), 'आंब्याची सावली' (१९७८) हे बनहट्टी यांचे प्रारंभीच्या काळातील कथासंग्रह आहेत.

या कथांमध्ये जीवनाविषयीचे कुतूहल आहे. हे कुतूहल बऱ्याचशा कथांमधून वेगवेगळ्या घटनांपुरते मर्यादित आहे. 'सुरुवात' कथेतील विश्वनाथ आणि नवपरिणीत वधू वासंती यांच्या लग्नानंतरच्या प्रवासाची कथा नाट्यपूर्ण संवादातून फुलते. 'इंटरव्ह्यू' कथेत एखाद्या ठिकाणी इंटरव्ह्यूसाठी निवडल्या जाणाऱ्या उमेदवाराकरिता होणाऱ्या गुंतागुंतीच्या प्रक्रिया इथे दिसतात. कमिटीमधील परस्परांची भांडणे, एकमेकांच्यावर चढाओढ करीत स्वत:चा 'कँडिडेट घुसविण्याची' माणसाची प्रवृत्ती यावरती ही कथा वास्तवपूर्ण प्रकाश टाकते. कथेच्या अखेरीला एका मंत्र्याच्या फोनने कलाटणी मिळते. 'समानधर्मा'तील अनेक कथांमध्ये माणसांची विविध रूपे दिसतात. 'खेळ' कथासंग्रहातील अनेक कथांमध्ये राजेंद्र बनहट्टी यांनी कथेतील पात्रांच्या मनामध्ये अधिक सूक्ष्म प्रवेश केला आहे असे वाटते. अशा कथा अधिक प्रभावी आणि परिणामकारक झालेल्या आहेत. '...त्यांच्या कथेतील व्यक्ती या संभाव्य, साहजिक तशाच स्तिमित करणाऱ्या असतात. या व्यक्ती कथेतील नुसती कळसूत्री पात्रे राहत नाहीत; तर त्या जिवंत माणसांचे रूप घेतात' हा बनहट्टी यांच्या कथेचा अर्थपूर्ण गौरव अरविंद गोखले यांनी केलेला आहे. कथेतील व्यक्तिरेखाटनाचे लेखकाचे कौशल्य वैशिष्ट्यपूर्ण आहे. याची साक्ष अगदी प्रारंभीच्या काळातील कथांमधूनही दिसते. माणसाच्या हालचाली, त्याची वर्तने, वृत्ती, त्याचे शब्द, इतकेच काय पण अगदी नुसत्या त्याच्या पाहाण्यामधून सुद्धा टिपली जाणारी सूक्ष्म स्थित्यंतरे बनहट्टी बारकाव्याने टिपतात. त्या त्या व्यक्तीचे एक संपूर्ण चित्र त्या अनुभवापुरते रेखाटणे हे 'रहस्य'मधील मिस्. पांगारे किंवा 'वारसा'मधील सोनटक्केमास्तर यांच्या उदाहरणांवरून दिसून येते. '...सारांश सोनटक्के दोनच वेळा माणसासारखे वागले आणि दोन्ही मुले गमावून



अनुक्रमणिका

**निवेदकाचे रूप**

*बनहट्टींच्या कथांतील निवेदने हा घटक एका स्वतंत्र अभ्यासाचा विषय ठरावा इतका महत्त्वाचा आहे. त्यांनी कथेतील निवेदक वेगवेगळ्या प्रकारे वापरला आहे. 'लग्न' व 'त्रिशंकू' यांसारख्या कथा सोडल्या तर त्यांच्या बहुतेक कथा तृतीयपुरुषी निवेदनपद्धतीचा अंगीकार करतात. सर्वज्ञ, सर्वसाक्षी निवेदकाचे रूप त्यांच्या कथेत प्राधान्याने आढळते. अशा निवेदकाचे एक कार्य असे असते की, एकाच वेळी सर्वत्र असणे, इतिहासाचे भान असणे, वर्तमानाची जाणीव असणे आणि भविष्याच्या शक्यतांचा विचार करणे. अर्थात असा सर्वज्ञ निवेदक बनहट्टींच्या कथेत वाचकांची कोणतीही निष्कर्षात्मक विधान करीत नाही की एखादे भाष्य करीत नाही. व्यक्तीविषयी, घटनांविषयी आपापले मत बनण्यास तो वाचकास मोकळे ठेवतो. त्यांच्या कथेतील निवेदन हे सातत्याने एकाच दृष्टिकोनातून होत नाही. प्रत्येक कथेत तर तो वेगळा असतोच.*

(श्री. राजेंद्र बनहट्टी यांच्या निवडक दीर्घकथा' डॉ. विलास खोले यांच्या प्रस्तावनेतून...)

बसले.' ('वारसा' - पृ.३७). यासारख्या एखाद्याच वाक्यातून त्यांचे वेगळेपण जसे लक्षात येते, तसे त्यांच्या पश्चात जागेचा ताबा सोडल्याचे अडीच अडीच हजार घेऊन जाणारे त्यांचे वारसदार, त्यांच्या स्वार्थी वृत्तीवर लेखकाने प्रकाश टाकलेला आहे. जीवनाविषयीचे एक सतत कुतूहल, जिज्ञासा वाटत राहाणे हा सजग, सर्जनशील कलावंताच्या मनाचा मूलधर्म आहे. राजेंद्र बनहट्टी यांच्या प्रारंभीच्या कथांपासून तर त्यांच्या प्रसिद्ध झालेल्या आजपर्यंतच्या सर्व कथांच्या केंद्रस्थानी हा मूलधर्म आहे, हे त्यांची कथा वाचताना सातत्याने जाणवते. मग ते कौटुंबिक जीवनातले नित्याचे प्रसंग असोत किंवा माणसाच्या स्वभावधर्माच्या आकलनाचे पडलेले प्रश्न असोत. माणसाला जाणून घेणे आणि जीवनावर निरागस प्रेम करणे हा राजेंद्र बनहट्टी यांच्या प्रतिभेचा सहजधर्म आहे.

कुटुंबामध्ये एखादी वडीलधारी व्यक्ती वृद्धत्वाने, रोगाने, शारीरिक व्याधींनी संपूर्णपणे अपंग बनणे आणि सर्व तऱ्हेची तिची सेवा कुटुंबातल्या एखाद्या व्यक्तीने करणे हे अतिशय अवघड काम आहे. वृद्धत्व, शारीरिक अपंगत्त्व, मानसिक चिडचिड या सर्व गोष्टी त्या व्यक्तीचे काम करणाऱ्या माणसाला, त्याच्या त्याच्या दैनंदिन व्यापासह सोसाव्या लागतात, कराव्या लागतात. आजच्या काळात अधिकाधिक विभक्त बनत चाललेल्या कुटुंबात हे चित्र आणखीन कष्टकारक बनते. 'खेळ' संग्रहातील 'अखेरचे बंड' ही कथा या पद्धतीचे जीवन जगावं लागणाऱ्या काकूंच्या व्यक्तिरेखेची आहे. परिस्थिती आणि नियती कधी कधी माणसाला किती अगतिक, हताश बनविते, हेही यातून दिसते. एकाच कुटुंबातील राजाकाका, नलूताई, भाऊ अशा विविध माणसांची या प्रसंगाकडे पाहाण्याचीही दृष्टी दिसते. 'भाऊ मला गोळी नको... मीच दिली रे माळ' या काकींच्या शब्दांतील वेदना आणि कारुण्य त्यांच्या सबंध व्यक्तिमत्त्वाला व्यापून उरते. 'खेळ' या संग्रहातील 'दोस्त', 'प्रेयसी', 'खेळ' या कथा लक्षणीय आहेत.

माणूस अनेकदा असे का वागतो? हा म्हटलं तर अगदी साधासोपा प्रश्न ! म्हटलं तर इतका

गुंतागुंतीचा की तो अनाकलनीय, अनुत्तरितच राहावा. असे अनुभव जीवनात अनेकदा येत असतात. कधी कधी माणसाला स्वतःच्या वागण्याचा, विचार करण्याच्या स्वतःच्या पद्धतीचाही चोरटेपणा जाणवतो. 'दोस्त' कथेतील लिमये यांच्या वागण्यातून हे सहजपणे दिसून येते. 'खारकर आपल्यापेक्षा चांगले आहेत, आपल्यापेक्षा वेगळे आहेत' ही जाणीव लिमये यांना छळत असते. स्वतःच्या क्षुद्रपणाची वाटणारी कीव आणि खारकरांचं सामान्यपण अनुभवताच लिमये यांना वाटणारं मनमोकळेपण या साऱ्या वास्तवाचे मार्मिक आणि भेदक चित्रण राजेंद्र बनहट्टी यांनी केलेले आहे. १९६० नंतरच्या या मराठी नवकथेत आलेली माणसाच्या अस्तित्त्वाची अर्थशून्यता, आयुष्याची उदासीनता, निराशयता, उगीचता ही मूल्ये त्यांच्या कथेत फारशी आलेली नाहीत. परंतु या काळात बदललेल्या समाजजीवनामुळे, कुटुंबात, माणसांच्या परस्पर संबंधात घडत चाललेले बदल, बदलणारे स्वभाव आणि माणसाची चिरंतन मूल्ये यांचा विचार त्यांच्या कथेत जरूर येतो.

माणसाला समजून घेणे, विलक्षण प्रभावी, व्यक्तिरेखा निर्माण करणे, जीवनातील प्रसंगांचे, एखाद्या अंगाचे सूक्ष्म विश्लेषण करणे हे राजेंद्र बनहट्टी यांच्या प्रतिभेचे विशेष गुणधर्म आहेत. एखाद्या कुशल चित्रकाराने सुंदर चित्र रेखावे, तसे बनहट्टी शब्दातून, वर्णनातून, स्वभावदर्शनातून तर कधी अगदी दोन तीन शब्दांच्या मोजक्या वाक्यातूनही कथेतील व्यक्तीचे सहजसुंदर स्तिमित करणारे चित्र काढतात. म्हणून बनहट्टी यांची कथा स्वाभाविक वाटते. त्यात मन गुंतून राहाते. 'आंब्याची सावली' या कथासंग्रहामध्ये लेखकाच्या ठिकाणी असलेल्या विनोदी वृत्ती, जीवनातील आणि मनुष्य स्वभावातील विसंगती टिपण्याची मनोवृत्ती दिसते. या कथासंग्रहातील कथांचे स्वरूप विनोदी प्रसंगांचे, तर कधी नाट्यपूर्ण शैलीतून, अतिशयोक्तीच्या अंगाने फुलवित जाणारे असे आहे. 'वरात' कथेतील वधूवरांची विवाहाची पहिली रात्र इस्पितळात साजरी होणे, 'विकतचे अध्यक्षपद' आल्यानंतर होणाऱ्या

> **'कथेची भाषा !'**
>
> *बनहट्टींच्या कथेची भाषा ही कथेच्या आशयाची मागणी पुरी करणारी आहे. त्यांची पात्रे प्राधान्याने ज्या पांढरपेशा मध्यमवर्गीय कुटुंबातील आहेत त्यांची भाषा ते योजतात. ती स्वाभाविकपणे संस्कृतनिष्ठ जशी होते तशीच संवादांत इंग्रजीचा उपयोगही करणे व्यक्तींच्या वयानुसार, स्वभावानुसार, त्याच्यावरील संस्कारांनुसार जी भाषा नैसर्गिक ठरेल अशी कथांत उपयोगात आणली आहे. भाषेतून व्यक्तीचे व्यक्तिमत्त्व प्रतिबिंबित होते याची त्यांना जाण आहे. पात्राचे अंतर्मनातील विचार आणि त्यांच्या संमिश्र भावना शब्दांत उतरण्याची ताकद त्याच्या भाषेत आहे. जे लिहिले गेले आहे ते निःसंदिग्ध असावे, पूर्ण स्पष्ट असावे यावर त्यांचा कटाक्ष आहे. त्यामुळेच त्यांच्या कथांत लहानलहान वाक्यांची मालिका येते. ती अधूनमधून क्रियापदरहितही असते आणि त्यानंतर पुन्हा वाक्यांतील आशय स्पष्ट करणारी करकरीत स्वरूपाची विशेषणे, क्रियाविशेषणे ते योजतात. ती बहुधा समानार्थी असतात. त्यांच्यामागे निश्चितार्थ व्यक्त करण्याचा उद्देश असतो. कथेच्या ओघात पात्रांची भावावस्था नेमक्या शब्दांत वर्णन करण्याकडे बनहट्टींचा कल आहे.*
>
> ('श्री. राजेंद्र बनहट्टी यांच्या निवडक दीर्घकथा' डॉ. विलास खोले यांच्या प्रस्तावनेमधून.)

मन:स्तापाचे चित्रण असे अनेक प्रसंग, या कथांमधून आलेले आहेत. वास्तवावरची मार्मिक टीका, विसंगती टिपण्यातील सूक्ष्मता, अतिशयोक्ती, नर्म विनोद, या वैशिष्ट्यांचा प्रत्यय 'आंब्याची सावली' मधील अनेक कथा वाचताना येतो.

'गंगार्पण' (१९८४), 'अवेळ' (१९८५), आणि 'कृष्णजन्म' (१९८८) या कथासंग्रहामधील राजेंद्र बनहट्टी यांची कथा व्यक्तिमनाच्या सूक्ष्मतेकडे अधिक जाणारी आहे. जीवनाच्या गुंतागुंतीच्या, संमिश्र अशा संघर्षात या कथांतील माणसे गुंतलेली दिसतात. अनेकदा, ती आत्मपरीक्षण करणारीही आहेत. अनुभव घेण्याच्या आणि व्यक्त करण्याच्या पद्धतीत इथे खास वैशिष्ट्य आहे. अतिशय साध्या सोप्या शब्दांत लेखकाने कथेची मांडणी केलेली आहे. जीवनाविषयी आणि माणसाच्या वागण्यविषयीच मूलतः काही प्रश्न निर्माण करणारी ही कथा आहे. स्वत:लाच स्वत:च्या वागण्यानं सुन्नपण यावं, अस्वस्थता निर्माण व्हावी, व्यक्तीच्या मनाचे, त्याच्या अंतरंगाचे अधिकाधिक सूक्ष्म पदर उलगडले जावेत, अशी अनेक वैशिष्ट्ये 'समंध', 'साप', 'हरवलेली माणसे', 'गंगार्पण' इत्यादी कथांमधून प्रकट होतात. अतिशय छोटेखानी वाक्य, शब्दांचा मितभाषीपणा आणि नेमकेपणा, व्यक्तिरेखेवर सरळ स्वच्छ प्रकाश टाकण्याचे बनहट्टी यांच्या प्रतिभेचे सामर्थ्य वर उल्लेखिलेल्या तीन कथासंग्रहांमधून विशेषत्वाने जाणवते. भावनांचे उद्रेकसुद्धा मोजक्या, संयत शैलीत मांडणे, हे इथे वेगळेपण लक्षात येते. या दृष्टीने 'समंध' कथेतील प्रा. बोडस आणि विद्यार्थी दिघे यांच्या परस्परसंबंधाची चित्रणे बघण्यासारखी आहेत. 'गंगार्पण' कथेतील आई आणि दादा यांच्या व्यक्तिरेखा त्यांच्या वेगळेपणासह मनस्वीपणे साकार झाल्या आहेत. 'आईचे स्वगत मधून मधून चालू. मनाची जखम ती शब्दांनी धूत बसायची', '...आईला काय वाटले, ते ती कधी आमच्यापाशी बोलली नाही..' यासारखी अनेक वाक्ये, अण्णा आणि आई यांच्यातले 'संवाद' या कथेचे मनस्वीपणा दाखवितात. दादांनी अण्णांसाठी डिपॉझिटची रक्कम देऊ केलेली होती. त्यावेळीच्या प्रसंगाबद्दल बनहट्टी लिहितात, "...पण रकमेचा अंदाज त्याला नसावा. नव्हे, तो नव्हताच. पावतीवरची रक्कम पाहाताच त्याचा चेहेरा एकदम स्तब्ध, थोडासा उदास, कमालीचा गंभीर झाला... तो दादांच्या अगदी जवळ गेला. त्यांना भिडलाच. चेहेरा वर करून त्याने सरळ दादांच्या डोळ्यांत पाहिले. एकटक शांत नजरेने.

'दादा, याची खरंच जरूर नव्हती.'

'तुला नाही. आम्हाला आहे.'

दादांनी विषय संपवला." भावनेची विलक्षण ताकद असलेले प्रसंग बनहट्टी कसे प्रभावी, मनस्वी चित्रित करतात, हे वर उल्लेखिलेल्या उदाहरणावरून दिसते. या कथेतील, आई - दादा - अण्णा यांच्या व्यक्तिमनांचे दर्शन खरोखरीच चटका लावणारे आहे. 'साप' या कथेतील पुरंदरे यांचे Wishful thinking अस्वस्थ करणारे आहे. एखाद्याच वाक्यातून त्या व्यक्तिरेखेला उजळून टाकणे आणि वाचकाच्या मनात अस्वस्थता निर्माण करणे, हे लेखकाच्या शैलीचे सामर्थ्य अनेक कथांमध्ये दिसते. 'कुंतीने नाही आपला पहिला पुत्र गंगार्पण केला तसं झालं समजा' (पृ. ५७) असे दादा आईंना म्हणतात.

व्यक्तिरेखांची वैशिष्ट्यपूर्ण निर्मिती हे राजेंद्र बनहट्टी यांच्या कथेचे वेगळेपण आहे. व्यक्तींचं मानसिक आंदोलन, तिच्या सत् असत् प्रवृत्ती, तिचा संमिश्र स्वभाव याचा शोध वेध ते कथांतून घेत असतात. व्यक्तीच्या कृत्यापेक्षाही त्याच्या मनातल्या विचारांचा वेध ते घेतात. हे कथेमध्ये मांडत असताना, लेखक म्हणून त्यांनी केलेली कलात्मक निवड, प्रसंगांची कौशल्यपूर्ण योजना, त्यांच्या शैलीचं असलेले विलक्षण वेगळेपण यामुळे बनहट्टी यांची कथा सौंदर्यनिर्मिती करते. मनुष्य जसा अनेकदा खूप विचार करतो, अंतर्मुख बनतो, तसा तो कित्येकदा अजिबात विचार करीत नाही हेही सत्य लेखकाने जाणलेले आहे. भिन्न भिन्न प्रकृतीच्या माणसांच्या मनाचा शोध त्यांनी कथांमध्ये घेतलेला आहे. व्यक्तींच्या स्वभावविशेषांमधून, रंगरेषांमधून त्यांची कथा चित्रासारखी उमटत गेली आहे. 'अवेळ' कथासंग्रहात सोळा कथा आहेत. 'गणिताचे मास्तर' मधील वैद्य मास्तर, 'पोरका' मधील मंगसुळी, 'भिंत' मधील केशव अशी कितीतरी उदाहरणे देता येतील. 'सांगाती' कथेत हॉस्पिटलमध्ये ॲडमिट झालेले दादा आणि त्यांना भेटायला येणारा रामदास ही व्यक्तिचित्रेही अशीच सुंदर रेखाटली आहेत. स्वत:ला जीवघेणा आजार झालेला असताना, त्यावरती पूर्ण संयम ठेवून, मात करून, दादांना 'पहिलं गुलाबाचं फूल आणणारा,' 'ज्ञानेश्वरी मी वाचून दाखविन' अशी लगेच तत्परता दर्शविणारा रामदास आणि विलक्षण सोशिक, गंभीर असे दादा मनामध्ये घर करतात. चिरपरिचित व्यक्ती पांडे हे हरवल्यानंतर कथानिवेदकाला येणारी बेचैनी आणि पांडे यांच्या बायकोची नवऱ्याबाबत कमालीची तटस्थता यातील परस्परविरोध, ताण 'हरवलेली माणसे' या कथेत येतो. 'नो...नो.. डोन्ट मिसुअंडरस्टँड मी... माझं त्या माणसाशी कधी जमलंच नाही... माझे वडील ते...' असे पांडे यांचा रुबाबदार ऑफिसर मुलगा म्हणतो. 'गंगार्पण' कथेतील, किंवा 'हरवलेली माणसे' या कथेतील संवाद त्या त्या

**'राजेंद्र बनहट्टींच्या व्यक्तिरेखा !'**

*बनहट्टींच्या कथांतील माणसे विचारी असतात. दुसऱ्याच्या वागण्याप्रमाणे आपल्या वागण्याचा, विचारांचा, मतांचाही पुन्हापुन्हा विचार करतात आणि प्रसंगी स्वत:ला दुरुस्त करण्याचा प्रयत्नही करतात. या दृष्टीने 'कृष्णजन्म' मधील दादा, 'समंध'मधील बोडस, 'मध्यंतर'मधील रामभाऊ, 'लांडगा' मधील भाऊराव या व्यक्तीरेखा नमूद करण्याजोग्या आहेत. विचाराअंती काहीवेळा या व्यक्तींना तोवर स्वत:लाच अपरिचित असणाऱ्या आत्मरूपाचा शोध लागतो. आपल्या हातून घडलेल्या चुकांचे भान उत्पन्न होते. घडलेल्या अपराधांची जाणीव होते. काही व्यक्तींच्या बाबतीत तर असे घडते की आपल्याला समजतात तसेही आपण नाही आहोत आणि आपले खरे रूप किंवा आपल्या व्यक्तिमत्त्वाचे एक अंग असेही आहे हे त्यांच्या ध्यानात येते (उदा. समंध). 'कृष्णजन्म', 'शेजारी', 'समंध', 'मध्यंतर' सारख्या कथांतून प्रधान व्यक्तिरेखांनी केलेल्या आत्मसंघर्षाचेही एक दर्शन घडते. व्यक्तिविशिष्ट हा त्यांच्या कथांतील एक प्रधान, गतिमान व क्रियाशील घटक आहे. त्यामुळे त्यांच्या कथांत कथानकाची निर्मिती करण्याचे श्रेय व्यक्तीकडे जाते.*

('श्री. राजेंद्र बनहट्टी यांच्या निवडक दीर्घकथा' डॉ. विलास खोले यांच्या प्रस्तावनेमधून...)











व्यक्तींचे भावविश्व उभे करणारे आहेत. नाट्ययुक्त संवाद, अगदी दोन-तीन शब्दांची सुद्धा छोटी प्रभावी वाक्ये, राग, लोभ, प्रक्षोभ इत्यादी तीव्र भावनावेग संयतपणे दाखविणे, ही वैशिष्ट्ये या कथासंग्रहांमध्ये जाणवतात.

राजेंद्र बनहट्टी यांच्या कथालेखनात त्यांनी दीर्घकथा या विशेषत्वाने लिहिल्या आहेत. विषय, कथावस्तू, निवेदन वातावरण आणि कालखंड या दृष्टिकोणातून विचार करता, या कथांना कादंबरीचा मूलधर्म लाभला आहे. दीर्घकथेत परिमाणाची एकात्मताही साधलेली आहे.

'शेजारी', 'कृष्णजन्म' आणि 'शुक्लकाष्ठ' या तीन दीर्घकथांचा 'कृष्णजन्म' हा कथासंग्रह आहे. या दीर्घकथांचा आवाका एखाद्या चांगल्या अस्सल कादंबरीचा आहे. निसर्गदृश्य असो, व्यक्तीमनाचा अज्ञात कोपरा असो, उदास संध्याकाळ असो त्यातील दृश्यात्मकता आणि चित्रमयता या दीर्घ कथांमध्ये चित्रित झालेली आहे. विस्तारपूर्वक, सूक्ष्म तपशील, सखोल वर्णन, त्या त्या कथावस्तूत लपलेला, अंतरंगातील कोलाहल बनहट्टी यांनी दीर्घकथेमध्ये मांडलेला आहे. उदाहरणार्थ '...तिला चुकवूनच अवी झट्दिशी वर आलेला आहे. पाखरू होऊन परतलेला आहे. घरट्यात दडला आहे. ही खेळायची वेळ. मैदानात हुंदडायची वेळ. अशा वेळी तो चोरासारखा घरी आलेला. तिला त्याची दखल नाही. फक्त मागे पुढे अंगण असलेला तो दुमजली आडवा बंगला पिवळ्या धमक मावळत्या उजेडात सोनेरी केशरी चमकतो आहे. झळाळतो आहे. बंगल्याच्या आत खोल्याखोल्यातून गढूळलेला अंधार उमटतो आहे... टेबलाशी अवी बसलेला आहे. हरवलेला. बेभान. समोर वही. हातात पेन. डोक्यात शब्द. पेनमधून शब्द ओघळत आहेत. आकाशात उजेडाचा विस्कटा झालेला आहे. तसाच डोक्यात कल्पनांचा- !' ('कृष्णजन्म' - पृ.६६) अवी हा लेखक मुलगा आणि त्याचे वडील दादा यांचीही एक स्वतंत्र प्रतिमा आहे. या दोघांच्या भावजीवनातले, स्वभावातले, जगण्याच्या पद्धतीतले अंतर आणि वेगळेपणा या कथेत आलेला आहे. 'अवी हा दादांचा मुलगा. एका विद्वान साहित्यिकाचा मुलगा. त्याची गोष्ट म्हणजे पर्यायाने त्यांचीच गोष्ट. निदान सुरुवातीला तरी. सामान्यांच्या दृष्टीने तरी. दादांनी लावलेल्या रोपट्याला हे फळ आलेले आहे. त्यांची इच्छा असो वा नसो' असे हे अंतर आहे. आपल्या मुलाची गोष्ट छापून आली आहे. या एवढ्या आनंदाने आनंदित झालेली अवीची आई आणि अवीच्या लिहिलेल्या कथेतील अनुभवाने, चित्रणाने, वर्णनाने अस्वस्थ झालेले दादा ही दोन व्यक्तिमत्वं अवीच्या संवेदनशील स्वभावावर खोलवर परिणाम करतात. अपेक्षाभंग, नैराश्य, वेदना, एकटेपणा, वेगळेपणा हे सारं आतल्या आत प्रचंड सहनशीलतेने सोसणारे दादा 'कृष्णजन्म' या कथेत दिसतात. अगदी जवळच्या, एकाच कुटुंबातल्या माणसामाणसांत इतके अंतर का पडते, प्रचंड दबावाखाली कुटुंबातल्या एखाद्या घटकाची मनाची घुसमट कशी होते. भावनेचा एकाकीपणा आणि पोरकेपणा कसा जाणवतो हे व यासारखे अनेक प्रश्न 'कृष्णजन्म' या कथेत निर्माण होतात. शेजारी कथेतील राधाकाकू आणि नाना यांच्या संसारात नानांना स्वतःच्या चाळीस वर्षे झालेल्या संसारात राहून राधाकाकूंबद्दल वाटणारी वैफल्याची भावना प्रकटली आहे. माणसांच्या हालचाली सहजपणे, चित्रमयतेने, सजीव संवादांनी रेखाटणे हे 'कृष्णजन्म' मधील कथांचे वैशिष्ट्य आहे.










पात्रांच्या अंतर्मनात चाललेली द्वंद्वे रेखाटून, कधी त्यातील अनोख्या भावपूर्णतेचे दर्शन घडवून, बनहट्टी यांच्या दीर्घकथा मनाची पकड घेतात. वाचकाने कथा हातात वाचायला घेतली की ती अखेरपर्यंत वाचकाला गुंतवून ठेवते.

'लांडगा' (१९८९), 'युद्धपर्व' (१९९२) 'प्रेक्षक' (१९९४) 'मध्यंतर' (१९९४) असे बनहट्टी यांचे पुढील कथासंग्रह आहेत. माणूस माणसामध्ये असला, कुटुंबात असला तरी त्याचे एकाकीपण, वयाच्या उत्तरार्धात, विधुरावस्थेत पत्नीच्या शिवाय पुरुषाच्या जीवनात जाणवणारा वेगळ्या प्रकारच्या एकाकीपणा, सर्व काही सुंदर असून, सुखाचे सारे मोहक कवडसे अंगांगावर पसरले असताना नियतीच्या फटक्यासरशी बदलले गेलेले भीषण वास्तव, माणसामाणसाच्या निकटसंबंधातही दडलेले गैरसमज आणि स्वार्थी हेतू - असे अनेक महत्त्वपूर्ण अनुभव 'लांडगा' मधील कथांमध्ये साकारले आहेत. 'झीरो अवर्स' मधील श्रीकांतची बायको सुनीता हिच्या वाट्याला आलेले अपार दु:ख, 'जागा जुनी झाली तशी माणसे जुनी झाली की टाकून द्यायची का?' हा 'लांडगा' कथेतील प्रश्न, नवलेच्या अत्यंत दु:खाचे कथानिवेदकाला झालेले दु:ख, 'कुंपण' कथेतील माणसाच्या स्वभावाच्या प्रवृत्ती यामधून बनहट्टी यांच्या कथानुभवाचे वेगळेपण लक्षात येते. 'झीरो अवर्स्' सारख्या कथेत पती-पत्नीतील नाजूक नाते कोमलतेने, हलक्या हाताने फुलत जाते. प्रणयाची, नाजूक भावनांची स्पंदने कथेत रंगत जातात आणि भावनेचा स्फोट होणारी एखादी घटना घडून ती कथी विलक्षण प्रभावी बनते.

बनहट्टी यांच्या दीर्घकथेत मानवी स्वभावातले मूलभूत प्रश्न निर्माण झालेले

**'वटवृक्षाची शाखा !'**

*मराठी-कथा सळसळीत ठेवणाऱ्या राजेंद्र बनहट्टी यांच्या लेखनाचा विचार करताना जाणवते की, हा लेखक मानवी जीवनाकडे, माणसाकडे, मनुष्यव्यवहाराकडे फार बारकाईने, चिकित्सकपणे पाहतो आहे. माणसाच्या मनाचा कोपरानूकोपरा धुंडाळायची त्याला इच्छा आहे. जीवनाचा प्रत्येक अंग निरखण्याची दुर्दम्य आकांक्षा आहे. विशेष म्हणजे कोणतीही झापड न लावता बनहट्टी एका स्वच्छ, नितळ दृष्टीने जीवनाकडे पाहतात. त्याचा शोध घेण्याचा प्रयत्न करतात. त्या शोधासाठी त्यांचं होणारं चिंतन त्यांच्या लेखनात सहजपणे उमटतं. आकाशाचं प्रतिबिंब पाण्यात पडावं, उमललेल्या फुलात सुगंध यावा, तसं विशेष म्हणजे हे सारं त्या त्या कथनाचा भाग म्हणूनच येतं. विषयानुरूप, व्यक्तीनुरूप, प्रसंगानुरूप वाचकाला अंतर्मुख करणारं जीवनभाष्य राजेंद बनहट्टी ज्या सोपेपणानं करतात, ते थक्क करणारं आहे. मनोविश्लेषण करताना किंवा मनाचा शोध घेताना त्यांची कथा थांबत नाही. तिची गती कायम राहते. त्यांच्या कथांमध्ये 'वाटलं', 'मनात आलं' असले शब्द नसतात. त्यांच्या व्यक्तिरेखांच्या, मनातील भाव, विचार, विकार, अस्वस्थता, समाधान यांचं ते वर्णन करीत नाहीत. या सोप्या गोष्टी ते त्या त्या व्यक्तींच्या कृतींमधूनच समर्थपणे दाखवतात. त्यांच्या काही कथांमध्ये निव्वळ घटना आहेत. पण त्या घटनांमधूनही व्यक्तिरेखा ठाशीवपणे उभ्या राहतात. थोडक्यात 'हंस' मासिकाचे साक्षेपी संपादक श्री. आनंद अंतरकर यांच्या शब्दांत सांगायचे तर श्री. राजेंद्र बनहट्टी यांची कथा ही मराठी कथेच्या वटवृक्षाची एक अत्यंत रसरशीत, डौलदार अशी शाखा आहे.*

श्री. राजेंद्र बनहट्टी यांच्या निवडक लघुकथा, संपादक श्री. श्रीराम सिधये यांच्या प्रस्तावनेमधून...



अनुक्रमणिका



दिसतात. जीवनाला अस्वस्थ करणाऱ्या या प्रश्नांमधून, लेखकाची जीवनाकडे पाहाण्याची दृष्टी व्यक्त होते. 'युद्धपर्व' ही पंच्याहत्तर पानांची दीर्घकथा आहे. या कथेवर आधारित नुकताच नाट्यप्रयोग झालेला होता. जुन्या पिढीतील वृद्ध आबा आणि नव्या विचारांची कर्तृत्ववान, उद्योगशील यशस्वी अशी मुले - उमेश आणि नाना या दोन मुलांमधील आणि पित्यामधील असणाऱ्या जीवनमूल्यांचा संघर्ष या कथेत आहे. एक संसार संपून उतारवयातला एकाकी असा आबांचा सुरू झालेला दुसरा संसार यांचे चित्रण या कथेत आहे. आबांचा करारीपणा, आयुष्यभर उभ्या केलेल्या, जतन केलेल्या वास्तूकडे पाहाण्याचा जगण्याचाही त्यांचा दृष्टिकोन भिन्न आहे. उमेश त्यांच्या सहवासात राहूनही बदलत जाणारी त्याची मानसिक स्थित्यंतरे, वृत्यंतरे या कथेत प्रकटली आहेत. त्याला अस्वस्थ करणारी त्याची घुसमट आणि त्यातून आबांच्या बाबत त्याच्या हातून घडणारी अविचारी कृती आणि आबांच्या अचानक मृत्यूने उमेशला न गुंतवता त्याची झालेली सुटका ही त्याच्या मनाची घालमेल प्रकट करणारी आहे. प्रचंड कोंडमाऱ्यातून उमेशची झालेली सुटका, मानवी जीवनातील नैतिकतेची, मूल्यांची, अस्तित्त्वाची, नातेसंबंधांची तुटलेपणाची आणि अबोल संघर्षाची रूपे या कथेत आहेत. जुन्या व नव्या विचारांचे संघर्ष व्यक्त करणारे प्रश्न यात आहेत. कथेतील कलात्मक संघर्ष असा निर्माण झालेला आहे की कथा वाचून झाली तरी अस्वस्थ करणारे अनेक प्रश्न निर्माण होतात. '...अनोळखी माणसाला न्याहाळावे तसे ते नानाकडे पाहात होते. त्यांची नजर चमत्कारिक बिचकलेली होती. त्यांच्यासमोर नाना बसला होता. परीटघडीच्या अधिकृत वेषातला. झोकदार पण परका! व्यवहारी निं बाजारी...! जखमी पाखरासारखी त्यांची नजर नानाच्या चेहेऱ्यावर भिरभिरली पिसाट... नि आंधळी...!' (युद्धपर्व - पृ. ४१) बनहट्टी यांच्या शैलीतील मानवी मनाचे सूक्ष्म आंदोलन टिपण्याचे सामर्थ्य आणि उत्कटता वरील एका उदाहरणातूनही सहजपणे जागवते. 'गुन्हेगार', 'अनोळखी', 'हँग ओव्हर', 'सारथी' अशा अनेक उत्कृष्ट कथा यामध्ये आहेत.

परमनप्रवेशाचे सामर्थ्य राजेंद्र बनहट्टी यांच्या कथालेखनात विशेष प्रकारचे आहे. जीवनदृष्टी कथेतून अभिव्यक्त होताना, मानसिक आंदोलने सांगताना, व्यक्तीच्या स्वभावाचे आणि वर्तनाचे तल्लख कंगोरे रेखाटताना बनहट्टी यांची प्रतिभा तिचे वेगळेपण दाखविते. 'प्रेक्षक' (जानेवारी १९९४) आणि 'मध्यंतर' (ऑगस्ट १९९४) या कथासंग्रहात हे विशेष करून जाणवते. कथाविषयात नाविन्य आणण्यासाठी जीवनाची कृत्रिम, नकली चित्रणे त्यांची कथा कधीही रंगवित नाही. या ठिकाणी त्यांची कथा मानसिक समस्येकडेही वेगळ्या तऱ्हेने वळलेली आहे. स्त्री च्या जीवनातील व्यथेची चित्रणे ते करतात. स्त्री च्या आयुष्यात स्वत:चे लग्न हा प्रश्न किती महत्त्वाचा. स्वत:चा जोडीदार कसा असावा या भावविश्वाविषयी तरुण मन नेहमीच स्वप्न रंगवित असते. सुलूचे या वयातले कोवळे मन आणि बहिणीच्या 'इच्छेची' नोंदही न घेता, तिचे लग्न कर्तव्य म्हणून 'उरकून टाकणारा' स्वत:च्या जबाबदारीतून मोकळा होणारा भाऊ यांची चित्रे लेखकाने 'लग्न' या कथेत चित्रित केलेली आहेत. पण इथे सुलूच्या मनातला कोंडमारा आणि तिला बेचैन करणारे अनेक प्रश्न या कथेत आलेले आहेत. समस्याप्रधान कथेचे एक वेगळे परिमाण या कथेला लाभले आहे. अतिशय संयत शैलीत सुलूच्या मनातील

भावनांचा आवेग प्रकटला आहे. 'या उदासवाण्या नकोशा परक्या घरात अजून कितीतरी जगायचं आहे. अगदी शेवटपर्यंत. आयुष्य संपेपर्यंत... मी मूक रडू लागले... तोंड बंद करून... मला कळत नव्हते मी स्वतंत्र आहे की परतंत्र?... '(पृ. ४७). 'भीष्माची बायको' या कथेतही अगदी जवळच्या नात्यातील, मनाने एकमेकांविषयी खरोखरी प्रेम असणाऱ्या व्यक्ती आहेत. मावशी आणि भाचा परस्परांकरिता कितीही करायला तयार असले तरी या कथेतील भाचा बाबू याला प्रश्न पडतो. 'मावशीच्या इच्छेकरता लग्न करून स्वत:चे पंख छाटून तरी मी मूलत: बदलणार आहे का?' हा बाबूचा आत्मचिंतनात्मक प्रश्न आहे.

एका वेगळ्या अर्थाने माणसाच्या जीवनातील समस्येकडे बनहट्टी यांची कथा वळलेली आहे. वेगळ्या अर्थाने म्हणण्याचे कारण असे की, मानवी अबोध मनातील विचित्र विकृती, अतर्क्य गुंतागुंतीच्या अनाकलनीय प्रतिमांच्या भाषेत समस्या या बनहट्टी यांच्या लेखनात येत नाहीत. अशा प्रकारे लिहिणे त्यांचा प्रकृतीधर्म नाही. तथापि मानसिक समस्येने निर्माण झालेले चारूच्या जीवनाचे वेगळेपण 'त्रिशंकू' या कथेत ('मध्यंतर' - कथासंग्रह) आलेले आहे. 'मध्यंतर' या कथासंग्रहात आलेल्या अनेक कथांचे अनुभवाच्या दृष्टीने वेगळेपण आहे. विलक्षण दारिद्र्य, दारुडा नवरा, अनेक मुलंबाळं असलेल्या बाईचे कष्ट आणि तिचा संसार 'कुटुंब' कथेत आहे. तिची असहायता आणि अगतिकता सुन्न करते. बनहट्टी लिहितात, 'चमकत्या उजेडात, दाटल्या गारव्यात आटलेल्या नदीसारखी सुन्न नि शुष्क दिसणारी हा बाई आहे. माणिकताईंसाठी काहीतरी भव्य दिव्य करावे आणि त्यांना 'कायमचे आपलेपण' वाटावे यासाठी धडपडणारे वृद्ध विधुर रामभाऊ आणि क़मालीच्या तटस्थ माणिकताई यांच्यामधील अंतर 'मध्यंतर' या कथेत आलेले आहे. माणिकताईंचे जीवन व्रतस्थ

**'नशीब!'**

*नरोत्तम बाहेर पडला. मी काहीच बोललो नाही. नुसता ऐकत राहिलो. नरोत्तम म्हणाला ते खरे होते. पांडेचे नशीब त्याच्याबरोबर, त्याचे आयुष्य त्याच्या हातात. तोच त्याच्या जीवनाचा धनी. आपण त्यात कशी ढवळाढवळ करणार? खरे आहे. पण नुसती चौकशीसुद्धा करू नये? नरोत्तमकडे तो पंचवीस-तीस वर्षे कामाला होता. रोज त्याला भेटत होता. दिवसाचे आठ तास त्याच्याजवळ बसत होता. पण नरोत्तमने सहज गंमत म्हणून बातमी सांगितली होती. पांडे बेपत्ता झाला! नरोत्तम तरी काय करणार? मीदेखील काय करू शकत होतो? मला त्याची उस्तवारी करायचे कारण नाही. त्यांच्यावाचून माझे काय अडणार होते? त्याच्याजागी आता खुद्द नरोत्तम येतो ऑर्डर न्यायला, वसुलीला. पण पांडेच्या जागी नरोत्तम आला तरी पांडे गेलाच. त्याची जागा नरोत्तम भरून काढणार नाही. ती रिकामीच राहणार. कारण माणसे बदलणे हे नोटा बदलण्याइतके सोपे नाही. तरीही मी पांडेंची पंचाईत करू नये. त्याचे नशीब त्याच्याबरोबर. त्यांचे आयुष्य त्याचे. त्यात डोकावण्याचा मला अधिकार नाही. तशी मला गरज नाही. अजब आहे हे नशीब. बाकी सगळ्या गोष्टी एकमेकांच्या दुसऱ्याला चालतात. अगदी दुसऱ्याची बायकोही. पण दुसऱ्याचे नशीब नाही. ज्याचे नशीब त्याच्याबरोबर. त्यात दुसऱ्याने पडायचे कारण नाही.*

*'हरवलेली माणसे' या कथेमधून...*

आणि आश्रमासाठी वाहिलेले आहे. 'शरीरामुळे माणूस मिळतोच असे नाही. शरीराचा सहवास आणि सोबत या वयात उपयोगी नाही' असे माणिकताई रामभाऊंना सांगतात. या कथेत रामभाऊंचे मृतपत्नी कमलाबाई यांच्यावरचे प्रेम खरे? का वार्धक्यात स्थळकाळापेक्षा वयापेक्षा सहवासाची सोबतीची गरज असणारे रामभाऊंचे मन अधिक बरोबर असे प्रश्न निर्माण होतात.

'समानधर्मा' ते 'मध्यंतर' या दहा कथासंग्रहांकडे पाहिले तर असे दिसते की कथा या वाङ्मय प्रकाराला बनहट्टी यांनी स्वतःचे वेगळे असे परिमाण दिलेले आहे. मानवी अंतरंगाची, व्यक्तीच्या स्वभाव-वर्तनाची, अनेक अनाकलनीय विस्मित करणारी आश्चर्ये ते दाखवितात. वरवर पाहता साध्या सोप्या वाटणाऱ्या घटनांमधून सुद्धा व्यक्तीच्या स्वभाववैशिष्ट्यांचे किंवा त्यांच्या जीवनातील समस्यांचे सूक्ष्मदर्शी चित्रण बनहट्टी यांच्या कथेत येते. त्यांच्या कथेतील माणसे तुमच्या आमच्या जगातील परिचित असतात. त्यांच्या काही कथांतील पात्रांचे जीवन हे मध्यमवर्गीय जीवनापेक्षा अतिशय वेगळ्या प्रकारचेही आहे.

त्या त्या पात्रांचा कथेमध्ये होणारा विकास, भावविश्व, त्यांची आंदोलने, रहस्ये आणि दु:ख हे सारे वाचकाला अस्वस्थ करणारे असते; अंतर्मुख बनवणारे असते; हे बनहट्टी यांच्या कथेचे महत्त्वाचे यश आहे. त्यांची कथा एकदा वाचून झालेली असली तरी ती पुन्हा पुन्हा वाचताना तिच्यातील ताजेपणा, कसदारपणा त्यातील उत्कट जीवनानुभवामुळे जाणवतो. 'राजेंद्र बनहट्टी यांच्या कथेला एक अपरिहार्य आणि विलक्षण विविधता लाभलेली आहे. विशिष्ट परिस्थितीत सापडलेल्या व्यक्तीच्या मानसिक प्रक्रियांचे सूक्ष्म, सुसंगत आणि जिवंत चित्र रेखाटताना कथेची लय वाढवित ती टीपेला नेऊन कथेचा शेवट साधणे आणि कथा संपल्यावरही त्याच लयीत वाचकाला कथेच्या आशयात तरंगत ठेवणे यातच राजेंद्र बनहट्टी यांच्या लेखणीचे यश सामावलेले आहे.' असा त्यांच्या कथेचा गौरव वसंत कानेटकर यांनी केलेला आहे. व्यक्तिप्रधान, घटनाप्रधान आणि काही प्रमाणात समस्याप्रधान असलेली बनहट्टी यांची कथा विशिष्ट मूल्यपरंपरा जोपासणारी आहे. नर्मविनोद, सूक्ष्म, वास्तवदर्शी स्वभावचित्रण त्यांनी लिहिलेल्या कथांमधून जाणवते. त्यांच्या लेखनशैलीतून कलात्मक गुणवत्ता प्रकट होते. कथेतील अनुभवानुसार ती स्वाभाविक, प्रत्ययकारी बनते. अनेक वाक्यातून, काही शब्दांमधून, लेखकाच्या व्यक्तिमत्त्वाचे उमटलेले प्रतिबिंबही जाणवते. कथा या वाङ्मयप्रकाराच्या मूळ प्रकृतीशी अस्सल इमान राखणारी त्यांची शैली आहे. त्यांनी लिहिलेल्या दीर्घकथेत आवाका कादंबरीचा आहे पण कथेचा एकजिनसी, एककेंद्री परिणाम हा प्रभावी असतो.

माणसाच्या स्वभावातले खरे-खोटे रंग दाखविणाऱ्या त्याच्या मनाच्या सूक्ष्मातिसूक्ष्म तरल गुंतागुंतीचे दर्शन घडविण्याऱ्या राजेंद्र बनहट्टी यांच्या कथेला विविधता आणि गतिमानता लाभलेली आहे. कथेमध्ये 'गोष्ट' असली तरी ती कथा माणसाच्या जीवनानुभवाच्या किती खोल गाभ्यापर्यंत जाऊ शकते, हे राजेंद्र बनहट्टी यांच्या कथेने दाखवून दिलेले आहे. मराठीतील कथासाहित्यात ती अनेक अंगांनी समृद्धतेची भर घालणारी आहे. वाचकांना सजीवतेचे, प्रसन्नतेचे अनुभव देणारी जीवनावर प्रेम करणारी बनहट्टी यांची कथा प्रसन्न आणि टवटवीत आहे. □

डॉ. ललिता कुंभोजकर, ३७, तुळशीबागवाले कॉलनी, सहकारनगर, पुणे ४११ ००९.










# संत साहित्याचा समर्थ नवभाष्यकार : डॉ. सदानंद मोरे

डॉ. दिलीप धोंडगे

संत साहित्याचा समर्थ नवभाष्यकार म्हणून मी डॉ. सदानंद मोरे यांचा उल्लेख करीत आहे तो अमर्यादित अर्थाने हे ध्यानात घेणे आवश्यक आहे. डॉ. सदानंद मोरे हे संत साहित्याचे अभ्यासक म्हटल्यावर केवळ तेवढ्याच साहित्याचे अभ्यासक असा गैरसमज होण्याची शक्यता नाकारता येत नाही. संत साहित्याकडे संकुचित दृष्टीने पाहिले जाते त्यामुळे अशा गैरसमजाची शक्यता निर्माण होते. दृष्टीची विशालता जेवढी तेवढी संत साहित्याची विशालता. दृष्टीची अपूर्णता सिध्द होईल; पण संबंधित साहित्याची होणार नाही. डॉ. मोरे संत साहित्याचे अभ्यासक आहेत म्हटल्यावर इतिहास, समाजशास्त्र, धर्मशास्त्र, तत्त्वज्ञान, साहित्यशास्त्र, समीक्षा, राज्यशास्त्र इ. विषयांच्या अभ्यासाची भरभक्कम बैठक त्यांनी घातलेली आहे. पौराणिक वाङ्मयापासून ते समकालीन सर्व प्रकारच्या साहित्याच्या वाचनाची जोड या बैठकीस मेळवून प्रत्येक बाबीकडे चिकित्सक बुध्दीने पहाण्याची त्यांची सवय आहे. संत साहित्य याचा अर्थ वारकरी संतांचे साहित्य हे उघडच आहे. वारकरी संप्रदाय हा महाराष्ट्र संस्कृतीचा गाभा आहे. म्हणजे संत साहित्याचा अभ्यास हा संस्कृतीचा अभ्यास ठरतो. संस्कृतीच्या अभ्यासाला केवढी तयारी हवी याची कल्पनाच केलेली बरी. डॉ. सदानंद मोरे बालपणापासून या संस्कृतीकडे जिज्ञासेने बघत आलेले दिसतात. ही त्यांची जिज्ञासा जागृत केली ती त्यांचे वडील ह.भ.प. श्रीधरअण्णा यांनी. अण्णांच्या या अविरत संस्कारांनी डॉ. मोरे अधिकाधिक जिज्ञासक होत होत चिकित्सक चर्चक होत गेलेले दिसतात. उपलब्ध पूर्वकालीन व समकालीन अभ्यासातील न्यूनाधिक पारखण्याची त्यांची क्षमता बळावत जाऊन चिकित्सेबरोबर नेमके हेच हवे हे ठामपणे सांगण्याची त्यांची संशोधनक्षमता सिद्ध झाली. डॉ. मोरे यांनी महाविद्यालयाच्या पहिल्या वर्षात असताना आचार्य अत्र्यांच्या 'मराठा' पत्रात तुकारामबीजेच्या निमित्ताने एक लेख लिहिला होता. अत्र्यांना तो आवडला व त्यांनी बीजेच्या वारीसाठी देहूला जाऊन डॉ. मोरे यांची प्रशंसा केली. या घटनेपासून मोऱ्यांच्या संत-साहित्याच्या लेखनाचे बीजारोपण होऊन त्याचा वेलू गगनावेऱ्ही



झेपावत जात असल्याचे आपण पहातच आहोत.

डॉ. मोरे यांच्या या चौफेर व्यासंगातूनच The Geeta : A Theory Of Human Action, Krisna : The Man And The Mission, मंथन (संतसाहित्यविषयक लेखसंग्रह), ताटीचे अभंग : एक विवेचन, पालखी सोहळा : उगम आणि विकास, वारकरी साहित्य : भूमिका आणि स्वरूप, त्रयोदशी (श्री ज्ञानदेव साहित्य संशोधन ) व महाराष्ट्राच्या सांस्कृतिक इतिहासाची तुकारामकेंद्रित पुनर्मांडणी करणारा बृहद् ग्रंथ 'तुकाराम दर्शन' असे ग्रंथ आजवर सिद्ध झालेले आहेत. या शिवाय डॉ. मोरे यांच्या एकोणिसावे शतक, सत्यशोधक ब्राह्मणेतर चळवळ या विशेष अभ्यास विषयांतून महात्मा फुले यांचे राजकीय विचार, निवडक पाळेकर हे ग्रंथही निर्माण झालेले आहेत. डॉ. मोरे हे प्रकृतीने कवी असल्यामुळे त्यांच्या लेखनाची सुरुवात ही काव्यनिर्मितीने होणे स्वाभाविकच. 'संदर्भांच्या शोधात', 'वाळूचे किल्ले' व 'बखर' हे त्यांचे काव्यसंग्रह प्रसिद्ध झालेले आहेत. त्यांच्या काव्यनिर्मितीचे पर्यवसान काव्याचिकित्सेत झालेले असले तरी त्यांची काव्यप्रकृती या स्थित्यंतरातही अचल राहिलेली आहे. किंवहुना ती सबल होत गेलेली आहे. संस्कृतिसंबंधीच्या प्रश्नोपप्रश्नांनी पछाडलेले मोरे, काव्य, काव्यचिकित्सा या माध्यमांतून प्रकटत राहूनही कादंबरी माध्यमाच्या धुमाऱ्यातूनही ते प्रकटणार आहेत. 'मराठीचिये नगरी' या शीर्षकाची कादंबरी लिहिण्याचा संकल्प त्यांनी सोडलेला आहे.

डॉ. मोरे आपल्या कुशाग्र बुद्धीचे नवनवोन्मेष विद्यार्थीदशेपासून प्रकट करीत राहिलेले दिसतात. महाविद्यालयीन शिक्षणात The Geeta : A Theory of Human Action या पीएच.डी.च्या प्रबंधाला पुणे विद्यापीठाचा गुरुवर्य रानडे-दामले पुरस्कार, विद्यापीठ अनुदान आयोगाचे करियर अवॉर्डी ठरल्यानंतर त्या अभ्यासाचे फलित म्हणून सिद्ध झालेल्या Krisna : The Man and his Mission हा उत्तम ग्रंथ व त्याला डॉ. बाबासाहेब आंबेडकर ॲकॅडमीचा कै. रा.भि. जोशी पुरस्कार आणि नंतर 'तुकाराम दर्शन' या महाग्रंथाला लाभलेले विविध पुरस्कार त्यांच्या विद्वत्तेची व बुहुश्रुततेची साक्ष पटवतात.

डॉ. मोरे यांच्यातील संशोधक हा संस्कृतीच्या अभ्यासाच्या गरजेतून निर्माण झाला आहे. पूर्वकालीन व समकालीन अभ्यासकांची अपुरी कुवत, कुवत असणाऱ्यांची पूर्वग्रहबाधित दृष्टी,


**डॉ. दिलीप धोंडगे**

- *के. टी. एच. एम. महाविद्यालय, नाशिक, येथे मराठी विषयाचा अधिव्याख्याता.*
- *'अरुण कोल्हटकर यांच्या कवितेचा शैलीवैज्ञानिक अभ्यास' या विषयावर एम. फिल. (पुणे विद्यापीठ).*
- *'संत तुकारामांच्या अभंगांचा शैलीवैज्ञानिक अभ्यास' या विषयावर पीएच्.डी (पुणे विद्यापीठ).*
- *अनुष्टुभ्, आलोचना, प्रतिष्ठान, भाषा आणि जीवन, कविता-रती, आमची श्रीवाणी वगैरे वाङ्मयीन नियतकालिकांत लेखन.*
- *'आमची श्रीवाणी' चे कार्यकारी संपादक.*
- *वाङ्मयविषयक अनेक परिसंवादांत निबंधवाचन.*



**परिचय**

सदानंद मोरे

२५/६/१९५२

एम.ए. (तत्त्वज्ञान) एम. ए. (प्राचीन भारतीय संस्कृती आणि इतिहास) पीएच्.डी. (तत्त्वज्ञान)

तत्त्वज्ञानाचा प्राध्यापक १९७४-१९८५ - न्यू आर्टस्, कॉमर्स अँड सायन्स कॉलेज, अहमदनगर.

१९९६ - प्राध्यापक आणि प्रमुख - संत ज्ञानदेव अध्यासन, पुणे विद्यापीठ,पुणे

**विशेष अभ्यासक्षेत्र :** संतसाहित्य, मराठी संस्कृती व इतिहास, महाभारत आणि गीता. महाराष्ट्रातील राजकारण आणि समाजकारण.

**प्रकाशने :** उपरोक्त विषयांवरील अनेक शोधनिबंध, लेख आणि पुस्तके.

**पुस्तके :** १. दि गीता : ए थिअरी ऑफ ह्यूमन ॲक्शन, २. कृष्ण : दि मॅन अँड हिज मिशन, ३. मंथन (शोधलेखांचा संग्रह), ४. त्रयोदशी (संत ज्ञानदेवांच्या संबंधी शोधलेख), ५. तुकाराम दर्शन, ६. पालखी सोहळा : उदय आणि विकास, ७. ताटीचे अभंग : एक विवेचन, ८. जागृतीकार पाळेकर (संपादन), ९. गीतारहस्याची निर्मितीमीमांसा.

**पुरस्कार :** १. गुरुवर्य रानडे-दामले पुरस्कार, पुणे विद्यापीठ, २. रा. भि. जोशी पुरस्कार, डॉ. बाबासाहेब आंबेडकर अकादमी, सातारा, ३. ग. दि. माडगूळकर पुरस्कार, महाराष्ट्र कामगार साहित्य परिषद 'त्रयोदशी' साठी, ४. सद्गुरू तनपुरे महाराज पुरस्कार, अ. भा. मराठी कामगार साहित्य संमेलन, अहमदनगर - 'तुकाराम दर्शन' साठी, ५. समर्थ रामदास पुरस्कार, समर्थ ट्रस्ट माळेगाव. 'तुकाराम दर्शन' साठी, ६. प्रोफेसर जिन्सीवाले पुरस्कार, नगर जिल्हा ऐतिहासिक वस्तुसंग्रहालय, अहमदनगर - 'तुकाराम दर्शन' साठी, ७. ना. गो. चाफेकर पुरस्कार, महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे - 'तुकाराम दर्शन' साठी, ८. ग्रंथोत्तेजक पुरस्कार, इचलकरंजी एज्युकेशन अँड सोशल ट्रस्ट, इचलकरंजी. - 'तुकाराम दर्शन' साठी, ९. महाराष्ट्र फाऊंडेशनचा वैचारिक साहित्य पुरस्कार - 'तुकाराम दर्शन' साठी, १०. सोलापूर येथील भैरू रतन दमाणी साहित्य पुरस्कार - 'तुकाराम दर्शन' साठी, ११. दीनमित्रकार मुकुंदराव पाटील पुरस्कार - 'तुकाराम दर्शन' साठी.

**इतर माहिती :** १. धुळे येथील का. स. वाणी प्रगत अध्ययन संस्थेच्या 'आमची श्रीवाणी' या नियतकालिकाचा संपादक. २. राज्य, राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय स्तरांवरील चर्चासत्रांमध्ये व परिसंवादांमध्ये सहभाग, निबंधवाचन व सूत्रसंचालन. ३. महाराष्ट्रभर विविध विषयांवर व्याख्याने. ४. आकाशवाणी आणि दूरदर्शवर व्याख्याने व चर्चा.



अनुक्रमणिका

विशिष्ट अभ्यासकांनी आपल्या लहरीनुसार मळलेल्या वाटेला राजरस्ता समजून अंधानुकरण करणाऱ्या इतर संशोधकांची अनुकरणशीलता, अभ्यासाच्या क्षेत्रातही अभ्यासेतर गौण मुद्द्यांना प्राप्त झालेले प्राधान्य वगैरे गोष्टींमुळे संस्कृतीचे अभ्यासक्षेत्र प्रदुषित होण्याची भीती डॉ. मोऱ्यांना वाटली व या प्रदूषणाला रोखणे व प्रदूषित क्षेत्राला शुद्ध करणे हे आपले संबंधित क्षेत्राचा अभ्यासक म्हणून उत्तरदायित्व आहे या भावनेने ते संशुद्धीच्या उद्योगाला लागले व ह्या संशुद्धितून जे संशोधन घडले ते त्यांचे उपर्युल्लिखित लेखन. जवाबदारी निभावता निभावता संशोधक म्हणून त्यांची प्रतिमा घडली आहे. परिणामत: त्यांच्या लेखनातून पूर्वग्रहरहित दृष्टीचा, अनाग्राही वृत्तीचा, संशोधनाचे क्षेत्र उंचावत नेण्याच्या तळमळीचा ठायी ठायी प्रत्यय येतो.

त्यांच्या या विविध ग्रंथांतील प्रतिवाद्यांचा थोडा थोडा परिचय करून घेत 'तुकाराम दर्शन' ह्या बृहद् प्रकल्पाचे अवधानपूर्वक अवलोकन करण्याचा प्रयत्न करू. डॉ. मोरे यांची दोनेक पुस्तके वगळता मी त्यांचे सर्वच लेखन वाचलेले आहे. प्रसंगोपात्त पुन:पुन्हा वाचीतही राहतो.

Krisna : The Man and His Mission या ग्रंथात डॉ. मोरे कृष्णाचे जीवन, कार्य व त्याचे तत्त्वज्ञान यांच्या परस्परसंबंधाचा अभिनव शोध घेण्याचा प्रयत्न करतात. हे परस्परसंबंध शोधण्यासाठी कृष्ण या मानवाचे परमात्मीकरण न करता कृष्ण परमात्म्याचे मानुषीकरण करणाऱ्या पद्धतीचा अवलंब करून दैवी-अवरोही (divine-descent) प्रारूपापेक्षा मूलादर्श-आरोही (exemplerascent) प्रारूपाचा वापर त्यांनी केला आहे. या दोन्ही प्रारूपांतील फरक स्पष्ट आहे. कृष्णाकडे देव म्हणूनच पहायला प्रारंभ केला की, त्याचे मूलादर्शित्व लोप पावते व केवळ श्रद्धेने पहाणे उरते. दैवी-अवरोही प्रारूप म्हणजे देवतेच्या पातळीवर

**'परिसस्पर्श !'**

*महाराष्ट्रातील सांस्कृतिक व्यवहार हा खराखुरा स्वांतत्र्यशील, समतावादी आणि जीवनाच्या लोकशाही करणाला पोषक असा व्हावयाचा असेल तर तुकोबा केंदस्थानी मानून खूपच मोठे कार्य निश्चित पार पाडता येईल. जनसमूहांना विश्वासात घेऊन आणि अलगपणाची बेटे न रचता, आत्मटीकेची जबाबदारी न विसरता क्रांतिकारकांना परंपरेशी जिव्हाळ्याने जोडून घ्यावे लागेल ही गोष्ट निश्चित; पण या संदर्भात क्रांतिकारक शक्तीच्या जोडीला राज्यकर्ता समूहही तुकोबांच्या या वारकरी संतपरंपरेचा वापर आपल्या प्रभुत्त्ववादी नीतीकरिता राबविणार ही गोष्ट सूर्यप्रकाशा-इतकी स्पष्ट आहे. अशा वेळी वारकरी परंपरेविषयी प्रेम राखूनही तुकोबांच्या पावलांवर पाऊले टाकून आजच्या प्रस्थापितांविषयी तुकोबाप्रेमी विचारवंत व जनसमूह निस्पृह व सडेतोड टीका व तसा प्रत्यक्ष वस्तुनिष्ठ व्यवहार करायला आज सिद्ध होणार की नाही हा खरा कळीचा प्रश्न ठरतो. तुकोबा जनसमूहांना बरोबर घेऊन पुढे गेले. पण ते करताना त्यांनी प्रस्थापितांचे वाभाडे तर काढलेच पण जनसमूहांच्या आंधळ्या व उदास भूमिकेचाही गौरव न करता त्यावर आपल्या वाणी व कृतीचे हत्यार उचलले. ही गोष्ट लक्षात ठेवून जर महाराष्टातील आजचे कार्यकर्ते पुढे गेले तरच परत एकदा तुकोबांच्या वाणीचा व जीवनाचा परिसस्पर्श आमच्या जीवनाला खरोखरी लाभला असे म्हणता येईल.*

डॉ. सदानंद मोरे यांच्या तुकाराम दर्शन या पुस्तकाच्या प्रा. राम बापट यांच्या प्रस्तावनेतून...



अनुक्रमणिका






> **‘संवाद !’**
>
> *जितक्या स्वाभाविकपणे तुकोबा आपल्या अभंगामधून स्वतःच्या मनाशी संवाद करतात (२४८५) तितक्याच सहजपणे जनांशीही करतात. आत्मप्रगटीकरण किंवा आत्माविष्कार करणारी त्यांची कविता जेवढी अस्सल आहे, तेवढीच इतरांना उपदेश करणारीही आहे. उपदेशामुळे तो कोठे बाळबोध होत नाही. करुणेतून भिजून आलेले त्यांचे शब्द जेवढे काव्यमय असतात तेवढयाच क्रोधातून पेटून आलेल्या त्यांच्या शिव्याही काव्यमय असतात. एरवी नामदेव ढसाळांसारख्या विद्रोही कवीला ते भावलेच नसते. औचित्य आणि अभिरुची यांच्यात फाजील अडकून पडलेले समीक्षक तुकोबांच्या अभंगामधील ग्राम्य शब्द-प्रयोगाबद्दल नापसंती व्यक्त करताना खरे तर आपल्या व्यक्तिमत्त्वातील दुभंगलेपणच प्रतिबिंबित करतात. त्यांना तुकोबांच्या शिव्या पेलवणार नाहीत, हे उघड आहे.*
>
> डॉ. सदानंद मोरे यांच्या तुकाराम दर्शन ाधील (पान क्र. ५४) तुका म्हणे जे जे ाटे। ते ते वाटे मी ऐसे ॥ मधून...

आपसूक उतरणे. उलट, मानवी - मूलादर्श पद्धतीत आरोहण आहे. मानवाला जे जे वांछीत व शक्य कोटीतले आहे त्याचे आधिक्य मानवी आरोहण पद्धतीत जाणून घेता येते. परिणामत: संबंधित देवता ही इतरांना केवळ श्रद्धेय न राहता अनुकरणीय ठरू शकते. कृष्णाचे जीवन-कार्य व त्याचे तत्त्वज्ञान या दोहोंत पारदर्शक परस्परसंबंध आहेत. त्याच्या तत्त्वज्ञानाशिवाय त्याचे जीवन व कार्य अंध असेल तर जीवन व कार्याशिवाय तत्त्वज्ञान निरर्थक ठरेल. कृष्णाच्या लीला ह्या त्याचे सबंध जीवन व कार्य या संदर्भात पाहायला हव्यात. कृष्णाचे जीवन जन्मापासून नाट्यात्मक घटना व संघर्षांनी भरलेले आहे. कृष्णाने अनेकविध जबाबदाऱ्या पेलल्या. कर्माचे महत्त्व स्पष्ट करताना मानवाच्या आदिअंताच्या कृतीही कर्मसंबद्ध असल्याचे कृष्णाने स्पष्ट केले आहे. कर्म हे केवळ मानवाच्या अस्तित्त्वासाठी आवश्यक नाही तर मानवी जीवनाच्या अर्थपूर्णतेसाठीही आवश्यक आहे. मीमांसा संकल्पनेपेक्षा गीताप्रणीत कर्मसंकल्पना व्यापक आहेत हे स्पष्ट करून श्रीमद्‌भगवद्‌गीतेचा विचार हा महाभारताच्या संदर्भात करायला हवा असे ॉ. मोरे सुचवतात.

डॉ. मोरे या ग्रंथात धर्मनीतीची कृष्णाचे जीवन व कार्य व तत्त्वज्ञानाच्या संदर्भात अत्यंत बुद्धिमत्तेने चर्चा करतात. युधिष्ठिराची धर्मकल्पना ही नियमस्वरूप आहे तर कृष्णाची धर्मकल्पना ही तत्त्वस्वरूप आहे. (गांधीजींची अहिंसा ही डॉ. आंबेडकरांना तत्त्वस्वरूप न वाटता नियमस्वरूप वाटली कारण तत्त्व हे अनुकरले जाते; नियम पाळावा लागतो. पुराणकाळातील विषयाप्रकाशात आधुनिक राजकारणाचा अन्वयार्थ मोरे अवधानपूर्वक कसा लावतात हे कळावे यासाठी हे उदाहरण.) कृष्णाला धर्मसंकल्पनेच्या शाब्दरूपाऐवजी आशयात रस होता. आशयाचे पोषण करण्यासाठी कृष्णाने त्यागही केला. धर्म आणि नीती यासंबंधी विविध शास्त्रांतील मतमतांतरांचा ांडोळा घेतल्यानंतर असा निष्कर्ष निघतो की : धर्म हीं बद्धक बाब आहे तर नीती ही मुक्तक. धर्माच्या पथावरून चालण्याचे बंधन नीतीमुळे ढिले होते. कारण नीतीमुळे विपथन (Deviation) करता येते. ज्ञानेश्वरीत ज्ञानदेवांनी कृष्णाचे कार्य हे धर्मनीती असे द्विदल स्वरूपी असल्याचे सांगितले आहे. तुकोबांची दयेची व्याख्या ‘दया तिचे नाव भूतांचे पालन। आणिक निर्दालन कंटकांचे ॥’

अशी द्विपरिमाणी असून पूर्वार्ध हा धर्मप्रतिपादक तर उत्तरार्ध हा नीतिप्रदिपादक असल्याचे डॉ. मोरे लक्षात आणून देतात. कृष्णचरित्राचा वारकरी परंपरेतला हा वेध कृष्णाचे जीवनकार्य व तत्त्वज्ञान याच्याशी अनुबंधित असल्याचे डॉ. मोऱ्यांचे प्रतिपादन आहे.

'मंथन' या लेखसंग्रहात डॉ. मोऱ्यांनी वारकरी संप्रदाय, वारकरी संत, विठ्ठलाच्या आद्य मूर्तीचा शोध, वारी, ज्ञानेश्वरीच्या अस्सल प्रतीची चर्चा या विविध विषयांवर स्फुट लेखन केलेले आहे. प्रसंगोपात्त केलेले हे लेखन संशोधनाची उंची वाढविणारे आहे. प्रस्तुत लेखसंग्रहाच्या नरहर कुरुंदकरकृत प्रस्तावनेतील खालील अभिप्राय लेखसंग्रहाचे मूल्यमापन करणारा आहे. कुरुंदकर लिहितात, '(डॉ. सदानंद) देहूकरांनी जे लिहिले आहे ते जबाबदारीने अभ्यासपूर्वक लिहिलेले आहे. त्यांचा पिंडच मुळी चौरस अभ्यास करून समतोलपणे विवेचन करण्याचा आहे. बारकाईने माहिती गोळा करावी आणि सावधपणे ती मांडावी हे त्यांना स्वाभाविक झाले आहे. ही माहिती देताना शब्दाच्या उलगड्यापासून ग्रंथाच्या प्रामाण्यापर्यंत आणि नवे पाठ सुचविण्यापासून नवे विवेचन सुचविण्यापर्यंत सर्व वैविध्य त्यांच्याकडे आहे....'

'ताटीचे अभंग : एक विवेचन' या छोट्याशा पुस्तिकेत डॉ. मोरे मुक्ताईच्या ताटीच्या अभंगातील प्रधान आशयसूत्र 'संतत्व' याचा संशोधनपर उलगडा करतात. संत या संकल्पनेचा पहिला उच्चार मुक्ताबाईने केला व ती संकल्पना वारकरी संप्रदायात क्रमशः विकसित झालेली ते आपल्या लक्षात आणून देतात. एवढेच नव्हे, तर महाभारतात

**'वारकरी परंपरा !'**

*तुकोबांचा विचार करताना तो वारकरी परंपरेच्या चौकटीत करावा लागतो. तुकोबा काय, किंवा ज्ञानदेव काय ही वारकऱ्यांची मक्तेदारी आहे असे मला म्हणायचे नाही. त्या दोघांनी स्वतःला वारकरी मानले होते, हे आपण विसरू नये एवढेच मला सुचवायचे आहे. ज्ञानदेव, नामदेव, एकनाथ, तुकाराम ही एक आत्मभान असणारी परंपरा आहे. विशेषतः तुकोबांची उपदेश परंपरा ही ज्ञानदेवांपर्यंत कशी पोचते, हे मी यापूर्वी अनेकदा दाखवले आहे. आजही वारकरी कीर्तनाचा समारोप-*
*बोलिली लेकुरे। वेडी वाकुडी उत्तरे॥ करा क्षमा अपराधा महाराज तुम्ही सिद्ध॥ नाही विचारला। अधिकार म्या आपुला॥ तुका म्हणे ज्ञानेश्वरा। राखायाते किंकरा॥ (२३२४) या तुकोबांच्या अभंगाने होत असतो. 'त्याद्वारे कीर्तनकार आपली सेवा ज्ञानदेवांना अर्पण करीत असतो. 'ज्ञानबातुकाराम' या मंत्रात सारी वारकरी परंपराच साररूपात आलेली आहे. ते नुसते नामस्मरण नसून परंपरास्मरणही आहे आणि तुकोबा हे या परंपरेचेही दर्शन आहे. वेगळ्या प्रकाराने हा मुद्दा आणखी स्पष्ट करावयाचा झाला, तर असे म्हणता येईल, की तुकोबा शिवाय वारकरी परंपरा पूर्णत्वाला पोहोचत नाही आणि वारकरी परंपरेची पार्श्वभूमी माहित नसेल, तर तुकोबांना समजून घेता येत नाही. तुकोबा हे काळदृष्ट्या ज्ञानदेव, नामदेव आणि एकनाथ यांच्यानंतर येतात. त्या तिघांचेही संस्कार तुकोबांवर झालेले आहेत. म्हणजेच हे तिन्ही प्रवाह तुकोबांच्या ठायी एकवटलेले आहेत. त्यामुळे तुकोबांचे आकलन पर्यायाने या तिघांच्या आकलनाला उपकारक ठरते, यांत शंका असू नये.*

डॉ. सदानंद मोरे यांच्या तुकाराम दर्शनमधील (पान क्र. १७३) 'धन्य म्हणवीन इहलोकी लोका' मधून...

> **'जागरण!'**
>
> *प्रबोधन ही संकल्पना युरोपीय इतिहासातील 'रेनसाँ' साठी वापरली जाते. वस्तुत: हीदेखील एक गैरसमजूतच म्हणावी लागेल. युरोपीय ज्ञानविज्ञानाचा मूळ स्रोत ग्रीकभाषेमधील ग्रंथामध्ये होता. हे ग्रंथ युरोपला पूर्णपणे पारखे झाले होते. लुप्त झाले होते. अगोदर ग्रीक परंपरेतील ज्ञानाची पुन:र्स्थापना युरोपीय विद्वानांनी अरबांच्या मार्फत केली. त्या मृत परंपरेचे त्यांनी पुनरुज्जीवन केले. तिला जणू संजीवनी दिली. म्हणून युरापीय 'रेनसाँ' हे एक संजीवनच होते. भारतात व महाराष्ट्रात पूर्व परंपरा मृत झालेल्या होत्या असे म्हणायला वाव नाही. वैदिक-संस्कृत परंपरा आणि संताची देशी मराठी परंपरा अशा महाराष्ट्रातील दोन परंपरा ठळकपणे दिसून येतात. या परंपरा मृत निश्चितच झालेल्या नव्हत्या. त्यांच्यावर एक प्रकारची काजळी चढली होती. मराठी परंपरा मृत झालेली नसून सुप्त झालेली होती. तिला संजीवनी द्यायची नसून तिचे जागरण करायचे होते. तेव्हा येथील संदर्भात प्रबोधन म्हणजे संजीवन नसून जागरण होते. आणि हे जागरण अगोदर म्हटल्याप्रमाणे वैदिक आणि संत अशा दोन परंपरांच्या अंगाने झाले. अर्थात या दोन परंपरामधील संबंध हा देखील जागरणाच्या काळात होत असलेल्या विचारमंथनाचा भाग होता. काहींनी या दोन परंपरा वेगळ्या मानल्या, तर काहींनी त्याच्यात समान सूत्र शोधण्याचा प्रयत्न केला.*
>
> डॉ. सदानंद मोरे यांच्या तुकाराम दर्शनमधील (पान क्र. २१३) 'परमहंस तरी जाणे सहज वर्म' या लेखामधून...

भगवद्‌गीतेला जे स्थान तेच वारकरी साहित्यात ताटीच्या अभंगांना आहे. तसेच श्रीकृष्णाने गीतोपदेश करून अर्जुनाचा मोह दूर केला आणि त्याला युद्धप्रवृत्त केले, त्याप्रमाणे मुक्ताईंनी ज्ञानदेवांना पुनःश्च लोकांमध्ये आणून उपदेशप्रवृत्त केले. या संतत्त्व कल्पनेचा तुकोबांनी परमोच्च विकास केला. ताटीचे अभंगांच्या विवेचनाच्या निमित्ताने डॉ. मोरे संतत्त्व ही कल्पना जशी स्पष्ट करतात तशाच आरूढपतित वगैरे संकल्पना स्पष्ट करीत ज्ञानदेवादी भावंडांचे संबंधित चरित्रही कथन करतात. समग्र वारकरी परंपरेच्या प्रकाशात एखादी संकल्पना तपासणे हा संशोधनातील महत्त्वपूर्ण भाग ठरतो.

'श्री तुकाराम महाराज पालखी सोहळा : उगम आणि विकास' या पुस्तिकेत डॉ. मोरे यांनी पालखी सोहळ्याच्या उगम विकासाबरोबरच श्रीविठ्ठल या दैवताचे प्राचीनत्त्व, पंढरपूरचे प्राचीनत्त्व, तीर्थक्षेत्रत्त्व मांडून तुकाराम महाराजांचे सुपुत्र तपोनिधि नारायण महाराज यांचे पारमार्थिक, धार्मिक व सामाजिक कार्य यांचा परिचय करून दिला आहे. नारायण महाराजांच्या सामाजिक कार्याचे फलस्वरूप म्हणून पालखी सोहळा हा उपक्रम मानता येईल. १९व्या शतकातील पालखी सोहळा, श्रीतुकोबारायांचे अभंग, संत तुकाराम महाराजांचे टाळकरी व लेखक हे महत्त्वपूर्ण लेख कितीतरी नवी माहिती प्रकाशात आणतात.

'वारकरी साहित्य : भूमिका आणि स्वरूप' या पुस्तिकेत डॉ. मोरे वारकरी साहित्यामागील भूमिका व स्वरूप वाङ्मयेतिहास व साहित्याचा मुख्य प्रवाह या संदर्भात चर्चितात. साहित्याचा मुख्य प्रवाह जास्तीत जास्त काळ साहित्य टिकून राहणे, साहित्य कालप्रवाहात टिकत असतानाच त्या साहित्यामध्ये प्रगती झालेली असणे. आपण विशिष्ट साहित्याच्या परंपरेचे आहोत याचे आत्मभान असणे व सर्वसमावेशकता असणे या चार कसोट्या आधाराला घेऊन ठरविला

पाहिजे. परिणामी, वारकरी साहित्य हा मुख्य प्रवाह ठरतो व मराठी वाङ्मयाचा इतिहास वारकरी अंगाने लिहिला जाण्याची आवश्यकता स्पष्ट होते. महाराष्ट्रातील सहा कोटी लोकांपैकी पाच लाख लोक दरवर्षी विठ्ठलदर्शनासाठी जमतात. म्हणजे जवळजवळ दहा टक्के लोकांना त्यांचा आत्मिक-मूल्यात्मक वाङ्मयीन जीवनरस वारकरी जीवनाच्या व वाङ्मयाच्या परंपरेतून मिळतो हे डॉ. रा.भा. पाटणकरांचे निरीक्षण डॉ. मोऱ्यांच्या उपर्युल्लिखित विवेचनाला पुष्टी देणारेच आहे. आशयसूत्रे, छंद वगैरे वारकरी साहित्याचे घटक हे वारकरी साहित्यातील चैतन्य अबाधित ठेवणारे असल्याचेही लक्षात आणून देतात. प्रस्तुत पुस्तिकेत दोन परिशिष्टे समाविष्ट केली आहेत. 'र.वा. दिघे यांच्या कादंबऱ्या आणि वारकरी दृष्टी' हे एक व 'दिलीप पुरुषोत्तम चित्रे यांची समीक्षा' हे दुसरे. र.वा. दिघे यांच्या साहित्यातील आजवरचे अलक्षित वैशिष्ट्य म्हणजे त्यांचा हिरो हा वारकरी शेतकरी आहे. पाणकळा, पड रे पाण्या, कार्तिकी, आई आहे शेतात, सराई, सोनकी या कादंबऱ्यांतील प्रमुख पात्रे ही खऱ्या अर्थाने एतद्देशीय म्हणजे वारकरी आहेत. प्रपंचाचे रूपांतर परमार्थात करणारी वारकरी शैली दिघ्यांनी नेमकी आत्मसात केली आहे हे त्यांचे वैशिष्ट्य डॉ. मोरे नमूद करतात. संत तुकोबा हे ह्या जीवनशैलीचे नमुनादर्श. परिणामत: दिघ्यांची पात्रे तुकोक्तींचा आधार घेत जीवन समजून घेतात व समजावूनही देतात. आपल्या विवेचनाचा समारोप करताना वारकरी साहित्य हा मराठी साहित्यातील मुख्य प्रवाह असल्याचे ध्यानात घेतले की र.वा. दिघे आपोआपच मराठी कादंबरीच्या केंद्रस्थानी जातात असा अभिप्राय डॉ.मोरे व्यक्त करतात.

### *'तुकाराममय!'*

*न्यायमूर्ती रानडे कसे तुकाराममय झालेले होते, हे सांगणारी दोन उदाहरणे ज़ात आहेत. इ.स. १८९७ मध्ये अमरावती काँग्रेस आटोपून ते आगगाडीने परतत होते. सोबत नामदार गोपाळ कृष्ण गोखले होते. पहाटे चारच्या सुमारास गोखल्यांची गाण्याच्या आवाजाने झोपमोड झाली. त्यांनी डोळे उघडले, तर रानडे तुकोबांचे दोन अभंग पुन्हा पुन्हा आळवताना त्यांना दिसले. ते ऐकून आपण नखशिखांत शहारलो असल्याचे गोखले सांगतात. (त्यातील एक अभंग म्हणजे ग्रँटसाहेबांचा आवडता, 'जे का रंजले गांजले' हा होता.) ते पुढे लिहितात, As I sat listening to these verses, I could not help realising how constant was Mr. Ranade's endevour to live upto this teaching and how simple and yet how glorious was the rule of life, that it incullated ! It was a rich moment in my life. The scene indeed will never tade from my memory. अर्थात असे असूनही आपण एकदा गाथा वाचून पाहावी, असे गोखल्यांना वाटले नाही, हा भाग वेगळा. या बाबतीत ते अखेरपर्यंत पक्के मेकॉलेग्रस्तच राहिले. मेकॉले पाठ करून गोखले इंग्रजांवर छाप टाकू शकले हे खरे, पण सामान्य माणसांच्या हृदयात ते कधीच स्थान मिळवू शकले नाहीत. आणि केवळ चांगले इंग्रजी बोलता आले म्हणून इंग्रज थोडेच स्वराज्य देणार होते? गोखल्यांमधील धार्मिकतेची ही उणीव पुढे महात्मा गांधींनी भरून काढली. रानड्यांनी सांगितलेली भागवतधर्माची परंपराच त्यांनी पुढे चालवली.*

डॉ. सदानंद मोरे यांच्या तुकाराम दर्शनमधील 'हा तो नव्हे काही निराशेचा ठाव' मधून ...
(पान क्र. २४४)










**'संस्थानिकांची रूपे !'**

*सदाशिवराव केळकर हे प्रार्थना समाजाचे प्रचारक, त्यांचे तुकारामप्रेम इतर प्रार्थना समाजिष्टांइतकेच होते. माधव आणि केशव ही त्यांची दोन मुले. त्यांच्यात विस्तव जाऊ नये इतके सख्य होते; पण तुकोबांच्या अभ्यासांत त्यांची कामगिरी अगदी समतुल्य ठरेल अशी आहे. केशव केळकरांचे श्री तुकाराम महाराज यांचे अध्यात्मिक चरित्र हे आणि माधव केळकरांचे साधुवर्य तुकाराम महाराज यांचे अध्यात्मिक चरित्र व शिकवण ही पुस्तके दुर्लक्षित असली, तरी महत्त्वाची आहेत. केशवरावांनी देहु ते पंढरपूर अशी पायी वारी करून वारकऱ्यांचा अनुभव घेतला होता. आपले पुस्तक त्यांनी देवास संस्थानचे अधिपती तुकोजीराव पवार यांना त्यांच्या तुकाराम प्रेमाखातर अर्पण केले. तुकोजीराव पवार महाराज हा राजा अहंकार सोडून तुकाराम महाराजांचा सेवक म्हणण्यात भूषण मानतो व ज्या गावात हत्तीवरून दसऱ्यास मिरवणूक काढतो त्याच ठिकाणी अनवाणी, भजनानंदात नाचत, पाठीस पताका बांधून गावभर मिरवण्यात धन्यता मानतो. या महाराजांनी आपल्या सद्गुरूंची म्हणजे तुकाराम महाराजांची चांदीची मूर्ती स्थापन करून ती श्रीकृष्णाबरोबर पूजेत ठेवली आहे. असे महाराजांचे वर्णन केळकरांनी केले आहे. महाराज स्वत: कीर्तन करीत व कीर्तनात उस्फूर्त अभंगही रचीत. देवासच्या गोकुळाष्टमीच्या उत्सवासाठी ते देहूकर मंडळींना प्राचारण करून भजनानंद लुटीत. आमचे अण्णा विद्यार्थी असताना रोज देवाला नैवेद्य घेऊन जात. एकदा महाराज देहूला आले असताना त्यांनी रस्त्यावरच या नैवेद्यामधील चतकोर भाकरी प्रसाद म्हणून घेऊन हातावर ठेऊन खाल्ली. मराठी संस्थानिकांची अशीही रूपे पाहायला मिळणे भाग्याचेच म्हटले पाहिजे. तुकोजीराव म्हणजे देवासची थोरली पाती. धाकट्या पातीचे महाराजही तुकोबांचे असेच भक्त होते.*

डॉ. सदानंद मोरे यांच्या तुकाराम दर्शनमधील (पान क्र. २८२) 'रात्रंदिवस आम्हा युद्धाचा प्रसंग' मधून...

र.वा. दिघे या कादंबरीकाराच्या कादंबरीवाङ्‌मयाची खऱ्या देशीतत्त्वांनुसार प्रथमच समीक्षा झालेली आहे असे म्हणावे लागेल.

'दिलीप पुरुषोत्तम चित्रे यांची समीक्षा' या परिशिष्ट दोन मधील लेखात डॉ.मोरे यांनी दिलीप चित्र्यांच्या समीक्षालेखनाची विविधांगे नजरेस आणून दिली आहेत. चित्र्यांच्या समीक्षेत ऐतिहासिक समीक्षा, सांस्कृतिक समीक्षा, नैतिक समीक्षा त्यांचा अंतर्भाव असून संघटनात्मक समीक्षेचा त्यांचा प्रयत्न प्रशंसनीय आहे. समीक्षेची उपपत्ती आणि उपयोजन या दोन्ही क्षेत्रांतील त्यांची कामगिरी गौरवास्पद आहे. सर्वात महत्त्वाचे म्हणजे मराठी साहित्याच्या केंद्रस्थानी तुकोबांना प्रस्थापित करून चित्र्यांनी मराठी कविता आणि समीक्षा यांची झडती घेतलेली आहे. चित्र्यांच्या या अभूतपूर्व प्रयत्नांमागे चाळीस वर्षांचे जगभरच्या विविध भाषांतील साहित्याचे परिशीलन-चिंतन उभे आहे. तुकोबा हे महाकवी; कारण तुकोबांपाशी वैश्विक मानवतावादी दृष्टिकोनाबरोबर आस्तित्त्वाच्या बहुपरिमाणात्मकतेचे भान व जीवनाच्या बहुमूल्यात्मकतेची जाणीव दिसते. गेल्या चारशे वर्षांत जागतिक वाङ्‌मयात तुकोबा अनन्यसाधारण कवी असल्याचे चित्रे स्पष्ट करतात व तुकोबांशिवाय मराठी ही कल्पनाच असह्य मानतात. प्रस्तुत लेखात कविवर्य चित्रे यांच्या साहित्यासंबंधीच्या मूलभूत चिंतनगर्भ विधानांची डॉ. मोरे नेमकी नोंद करतात. 'श्रेष्ठ कविता ही एका आध्यात्मिक दर्शनाला भावनात्मक रूप देते.', 'कविता ही जाणिवेची एक घटना, पण या जाणिवेचे प्रभावी निमित्त म्हणजे प्रत्यक्ष जीवन' इत्यादी. ही सूत्रे खूप काही सुचविणारी आहेत. पाऊंडच्या संदर्भातला

चित्र्यांचा अभिप्राय चिंतनगर्भतेचा नमुना म्हणून पहाता येईल. पाऊंडच्या 'सर्ग' या महाकवितेचा परिचय करून देताना ते म्हणतात. 'मराठी 'सर्गा'ना सर्वात जवळचे असे आध्यात्मिक आत्मचरित्ररूप महाकाव्य एकच, तुकारामाची संपूर्ण गाथा. मराठीतला पहिला संपूर्णपणे आधुनिक कवी तुकाराम. समकालिनापेक्षाही मला तो आधुनिक वाटतो. कविता म्हणजे जाणिवेची अविरत वाढणारी शब्दरूप घटना याचे त्याला सहजज्ञान होते. आत्मनिरूपणाचे स्वरूप असलेली आणि विश्ववास्तवाचाही त्याचवेळी ठाव घेणारी आत्मनिष्ठ कविता प्रथम तुकारामाने लिहिली.' कविता हे आत्मप्रगटीकरणाचे माध्यम असल्यामुळे ते आत्मचरित्रच असते अशी चित्र्यांची काव्यसंकल्पना आहे. तुकारामांनंतर मराठी साहित्य लयाला गेले असे दिसत असल्याचे चित्र्यांचे मत आहे असे डॉ.मोरे यांनी स्पष्ट केले आहे.

र.वा.दिघे यांनी कादंबरीच्या अवकाशात वारकरी संवेदनानुभ मांडला. चित्रे काव्यावकाशात व समीक्षेच्या परिघात हाच संवेदनानुभव मांडून आपल्या मुळांपर्यंत भिडतात. आपली परंपराच नामदेव तुकारांची भावमूलक, ध्वनिप्रधान, रसोत्कट आणि अस्तित्त्वमार्गी कवितेची परंपरा असल्याचे चित्रे यामुळेच प्रतिपादन करतात. परिणामत: मराठी वाङ्मय परंपरेतच स्थान मिळावे अशी मनीषा ते आपल्या काव्यातून व्यक्तही करतात.

> **_'संतत्व आणि कवित्व!'_**
>
> _संत हा शब्द आजकाल अर्थ विस्ताराने व सैलसरपणाने वापरण्यात येत असतो. पण एक गोष्ट विसरता कामा नये, की संत या संकल्पनेचा विकास मुख्यत्वे मराठी संस्कृतीत व विशेषत: वारकरी परंपरेत झालेला आहे. संत संकल्पनेचा पहिला स्पष्ट उच्चार मुक्ताबाईंनी केला, तो ताटीच्या अभंगात पाहायला मिळतो. अलिकडे प्रा. मा. ना. आचार्य यांनी तुकोबांवरील एका व्याख्यानात (तो त्यांच्या ज्ञानमयूरा ची कविता या संग्रहात समाविष्ट आहे.) संत आणि संतकवि यांच्यावर फार चांगले विवेचन केले आहे. ते म्हणतात, 'संतकवि हा शब्द समानाधिकरण तत्पुरुष आहे. अधिकरण म्हणजे निर्दिष्ट वस्तू. जो संत तोच कवि. म्हणजे संतांच्या बाबतीत संतत्व आणि कवित्व या एकाच नाण्याच्या दोन बाजू.' डॉ. हे. वि. इनामदार संपादित 'अनुभव तुकोबांचा' या संग्रहात आचार्यांनी आजवरच्या तुकाराम अभ्यासाचा आढावा शोध, बोध आणि वेध या अंगानी घेतला आहे. अशा अभ्यासाचा ते एक नवे मार्गदर्शक प्रारूपच ठरेल._
>
> डॉ. सदानंद मोरे यांच्या तुकाराम दर्शनमधील (पान क्र. ४४६) 'तुकानिर्मित सेतूवरूनी । मीहि आलो ख्रिस्तचरणी' मधून...

'हरवले जेथे ज्ञानदेव तुकाराम
तिथेचि मला तुम्ही द्या पूर्णविराम
सूक्ष्मपणे सर्व परंपरा नसे
तिथेचि मला स्थान द्या थोडेसे'

चित्रे आपल्या समीक्षेला सांस्कृतिक समीक्षेचे परिमाण प्राप्त करून देतात हेही डॉ. मोरे लक्षात आणून देतात.

'त्रयोदशी' हा डॉ. मोरे यांचा श्रीज्ञानदेव साहित्य संशोधनाला वाहिलेला तेरा लेखांचा

> **'संतांचा प्रभाव !'**
>
> *या काळात माधवरावांचे (कवी माधव जुलियन) मन नास्तिकाकडून आस्तिकाकडे वळू लागले होते, असे त्यांचे चरित्रकार गं. दे. खानोलकर सांगतात. माधवरावांचेच एक पत्र उधृत करून ते म्हणतात- 'या काळात ते अधूनमधून प्रार्थना समाजात जात. तेथे त्यांना शांती मिळे.' याचाही उल्लेख खानोलकरांनी केला आहे. प्रार्थना समाज म्हटल्यावर तुकोबा आलेच. 'धार्मिक बाबतीत संत तुकारामांचे अभंग रोज एक याप्रमाणे वाचून त्यावर मनन करावे असे वाटते.' हे माधवराव २२ जानेवारी १९२१ च्या पत्रात लिहितात. अर्थात ते त्याचप्रमाणे प्रत्यक्षात तुकोबांचे वाचन - मनन करत असावेत, असे त्यांच्या कवितांमधील तुकोबांच्या संदर्भावरून सहज लक्षात येण्यासारखे आहे. फर्ग्युसन कॉलेजमधील इंग्रजीचे आध्यापक वासुदेव बळवंत पटवर्धन हे माधवरावांचे विशेष आदरस्थान होते. वासुदेवरावांच्या तुकोबा आणि संतकाव्य यांच्या विषयीच्या प्रेमाबद्दल यापूर्वी विस्ताराने लिहिले आहेच. त्यांचाही प्रभाव माधवरावांवर पडला असणार हे उघड आहे.*
>
> डॉ. सदानंद मोरे यांच्या तुकाराम दर्शनमधील (पान क्र. ५१०) 'विठ्ठलाचा वेडा भक्तगण' मधून...

संग्रह आहे. म्हणूनच त्रयोदशी हे नामकरण केले आहे. आपल्या आत्मनिवेदनात डॉ.मोरे लिहितात की 'ज्ञानदेवांचा अभ्यास साहित्यशास्त्र, तत्त्वज्ञान आणि इतिहास या तीन अंगांनी व्हायला हवा. अर्थात विशेष अभ्यासक्षेत्रे आणि त्यांचे विशेषज्ञ या आज रूढ असलेल्या बाबी सोय म्हणून ठीक असल्या तरी अंतिमत: या तिघांची परस्परसंगती लावून एक व्यवस्था प्रस्थापित करता आली पाहिजे असे माझे मत आहे. व्यक्तिश: मी ज्ञानदेवांचा अभ्यास या तीनही अंगांनी करायचा प्रयत्न माझ्या मगदुराप्रमाणे केलेला आहे. एका क्षेत्रातील प्रमेयाचा परिणाम दुसऱ्या क्षेत्रावर झाल्याशिवाय राहात नाही हा माझा अनुभव आहे.' यामुळे प्रस्तुत ग्रंथात 'विसाव्या शतकाची पार्श्वभूमी' व 'संतसाहित्याचे समाजशास्त्रीय अध्ययन' या दोन लेखांचा समावेश केलेला आहे. ज्ञानदेव आणि वारकरी संप्रदाय यासंबंधी लिहिणाऱ्यां बहुतेक संशोधकांना प्रत्यक्ष वारकरी परंपरेची माहिती फारच थोडी असते. जी असते ती ऐकीव व वाचीव. डॉ. मोरे यांनी ही परंपरा आतून पाहिलेली व अनुभवलेली असल्यामुळे त्यांच्या विवेचनाला परिपूर्णता लाभते. ज्ञानदेवविषयक समग्र लेखन या प्रकाशातच झालेले आहे. त्रयोदशी या ग्रंथाच्या मुखपृष्ठापासूनच संशोधनाला आरंभ होतो (अशा प्रकारचे हे पहिलेच संशोधन असावे.) ज्ञानदेवांची समाधी ही योग्याची मुद्रासमाधी नसून कथाकीर्तन करणारी भजन करणारी समाधी आहे. या संकल्पनेच्या आधाराने दिनदर्शिकेच्या स्वरूपात एक चित्रही चित्रकार चंद्रशेखर जोशी यांच्या मदतीने डॉ.मोरे यांनी प्रसिद्ध केले आहे.

ज्ञानेश्वरीचा महासिद्धान्त म्हणजे ज्ञानप्राप्ती होऊन मोक्षाधिकार असतानाही कर्म आणि भक्ती खंडित होऊ न देणे हा आहे. भक्तिसंप्रदाय म्हणून वारकरी संप्रदायाचे हे तत्त्वज्ञानच आहे. म्हणून ज्ञानदेवांचे गीताभाष्य म्हणजे ज्ञानेश्वरी हे मानवी जीवनाच्या अंगाने केलेले भाष्य असल्याचे डॉ. मोरे स्पष्ट करतात. म्हणूनच त्यात ज्ञानासाठी कर्म वा भक्ती टाकण्यास सांगितलेले नाही. त्यात कर्म आहे, भक्ती आहे, सौंदर्यही आहे. ज्ञानदेवांची गीतासंगती ही एका अर्थाने मानवी जीवनाचीच संगती असल्याचे डॉ. मोरे लक्षात आणून देतात.



अनुक्रमणिका

आनंदवर्धन, अभिनवगुप्त व ज्ञानदेव या लेखात डॉ. मोरे आनंदवर्धन अभिनवगुप्त या परंपरेत ज्ञानदेवांची स्थाननिश्चिती करण्याचा प्रयत्न करतात. काश्मिरी शैव तत्त्वज्ञान, हा तिघांना सांधून जाणारा एक महत्त्वाचा धागा आहेच; पण आनंदवर्धन यांनी शास्त्रनय व काव्यनय यांच्यात विरोध नसून ते एकत्र नांदू शकते हे सैद्धान्तिक पातळीवर मांडले व ह्याच सिद्धान्ताचे प्रत्यक्षीकरण ज्ञानदेवांनी ज्ञानेश्वरी लिहून केले. इतकेच नव्हे, तर आनंदवर्धनाचे त्रिसंमिताची (स्वामिसंमित, मित्रसंमित आणि जायासंमित) कल्पना मांडली या कल्पनेत ज्ञानदेवांचा शांतरस बसणे शक्य नसल्यामुळे मातृसंमित हे चतुर्थ संमित खास ज्ञानदेवांचेच मानावे असा डॉ. मोऱ्यांचा अभिनव निष्कर्ष आहे. यामुळे आनंदवर्धन-अभिनवगुप्तांची काव्यपरंपरा ज्ञानेश्वरीत पूर्णत्त्वास पोचून ज्ञानेश्वरी हा काश्मिरी काव्यपरंपरेचा कलश ठरतो हे 'ज्ञानेश्वरीतील मातृसंमित' या लेखात ते दाखवून देतात. 'त्रयोदशी'तील प्रत्येक लेख हा इतका संशोधन परिप्लुत आहे की या ग्रंथावर स्वतंत्र लेखच लिहायला हवा. केवळ शलाकापरीक्षा म्हणून काही लेखांचे विवेचन केले आहे.

डॉ. मोरे यांच्या आजवरच्या संशोधनातील कलशाध्याय म्हणजे 'तुकाराम दर्शन' हा बृहद् प्रकल्प. वारकरी संप्रदायाच्या कलशस्थानी असलेल्या तुकोबांचे दर्शन घेणे ही गोष्ट अत्यंत आव्हानात्मक. हे आव्हान त्यांनी बुद्ध्या स्वीकारले व आपल्या अभिप्रेत अभ्युपगमाला न्याय देत लीलया पेललेले दिसते.

**_'जीवननिष्ठा!'_**

*१९६८ मध्ये गं. बा. सरदारांनी तुकोबांच्या निवडक आठशे अभंगाचे संपादन प्रसिद्ध केले. त्याचे नाव तुकाराम दर्शन अर्थात अभंगवाणी प्रसिद्ध तुकयाची असे ठेवले. या संपादनाला त्यांनी दीर्घ प्रस्तावनाही जोडली आहे. त्यात त्यांनी महत्त्वाचे मुद्दे मांडले आहेत. उदा. 'मोक्ष सुखासाठी हपापलेले लोक अभागी व अरसिक आहेत. अशी तुकोबांची समजूत होती. मात्र भक्ति, ज्ञान, योग आणि कर्म या इतर मार्गांच्या तोडीची किंवहुना त्याहीपेक्षा वरचढ अशी स्वतंत्र जीवननिष्ठा आहे अशी त्याची धारणा होती.' 'परमार्थ हा शब्द उच्चारला, की आपल्या डोळ्यांपुढे मोक्षसिद्धी आणि परलोकसाधन या कल्पना येतात. लोकांच्या मनावर या दोन्ही कल्पनांचा जबरदस्त पगडा होता. तुकारामांनी त्यांना आपल्या विचारसरणीत गौण स्थान दिले. 'नव्हती ते मुक्त आवडे संसार' आणि 'झाला इहलोकी परलोक' या उक्तितील अभिप्राय अगदी स्पष्ट आहे. त्यांचा परमार्थ ऐहिकनिष्ठ आहे. मानवाला आपले परमोच्च ध्येय इहलोकातच साधना येईल. आत्मदर्शनाचा सुखसोहळा त्याला 'याचि देही याचि डोळा' भोगता येईल, असा त्याचा विश्वास होता. म्हणून तुकोबांचे वाङ्मयात नरदेह, पार्थिवता, मृत्यूलोक आणि लौकिक व्यवहार यांबद्दल तुच्छबुद्धी नाही.'*

डॉ. सदानंद मोरे यांच्या तुकाराम दर्शनमधील (पान क्र. ५७६) 'उत्तम त्या याति। देवा शरण अनन्यगति' मधून...

डॉ. मोरे यांचे तुकोबांशी अनेक स्तरांवरचे नाते असल्यामुळे हे आव्हान स्वीकारायला ते प्रवृत्त झाले. डॉ. मोरे हे तुकोबांच्या दहाव्या पिढीतील वंशज या नात्याने त्यांच्याशी रक्ताने संबंधित. पिढीजात वारकरी म्हणून त्यांचा तुकोबांशी सांप्रदायिक संबंध आणि मराठी संस्कृती व संत साहित्याचे अभ्यासक या नात्यानेही डॉ. मोरे तुकोबांशी संबद्ध आहेत. या अतूट नात्याला जरादेखील मर्यादातिक्रमणाचा धक्का पोचू नये याची डॉ. मोरे यांनी ग्रंथभर जबाबदार

**‘तुका म्हणे आता !’**

*मराठी वाचकांना पु.ल. देशपांडे मुख्यत्वे विनोदकार आणि नाटककार म्हणून परिचित आहेत. ‘पुलं’ची नाट्यलेखनाची कारकीर्द सुरू झाली तीच मुळी त्यांनी १९४८ मध्ये तुकोबांवर लिहिलेल्या ‘तुका म्हणे आता’ या नाटकाने. या नाटकाची अर्पण पत्रिकाही फार महत्त्वाची आहे, ‘ज्ञानियांच्या राजापासून साने गुरुजींपर्यंतच्या मराठी साहित्यिकांची आणि संतांची, श्रद्धावंत आणि बुद्धिवंतांची मस्तके ज्या कल्पनेपुढे आदराने नमली त्या पुंडलिकाच्या भेटीसाठी अठ्ठावीस युगे विटेवर तिष्ठत असलेला पंढरीचा पांडुरंग या दिव्यकल्पनेस’ अशी ही अत्यंत बोलकी अर्पणपत्रिका आहे.*

*‘पुलं’चे हे पहिलेवहिले नाटक. ते काहीसे बाळबोध झालेअसले तरी एक चांगले नाटक आहे. तुकोबांच्या अभंगाच्या वह्या ब्राह्मण पंडितांनी बुडविल्या आणि त्या लोकगंगेने तारल्या या एकाच महत्त्वाच्या प्रसंगाचे दर्शन त्यातून घडते हे खरे असले तरी नाटककार आणि विचारक्षम कलावंत या नात्याने ‘पुलं’ची ओळख पटायला ते पुरेसे आहे. अधिकार नसताना अभंगरचना केली या आरोपाबद्दलची आपली कैफियत मांडताना ‘पुलं’चे तुकोबा म्हणतात, ‘महाराज आपण देहांताची शिक्षा फर्माविली तरी एकदा नाही दहादा सांगेन, की मी अपराधी नाही. याउपर आपली इच्छा. दिनदुबळ्यांचा कळवळा, दंभाची चीड, जन्मजात थोरवीचा निषेध आणि पांडुरंगाविषयीचे दृढभाव हे जर माझे अपराध असतील, तर मला आपण जरूर शासन करा.’*

डॉ. सदानंद मोरे यांच्या तुकाराम दर्शनमधील (पान क्र. ५९०) ‘मराठी साहित्याला धम्म काही शिकवीन’ मधून...

अभ्यासक या नात्याने काळजी घेतली आहे.

तुकाराम दर्शन ह्या बृहद् प्रकल्पाकडे तसेच एकूणच संत साहित्य व वारकरी संप्रदाय यांच्या अभ्यासाकडे ते कसे वळले याचे विवेचन आरंभी येऊन गेलेच आहे; पण तुकाराम दर्शन या प्रकल्पाकडे ते वळले याला आणखीही काही महत्त्वाची कारणे आहेत. तुकोबा हे वारकरी संप्रदायाच्या इमारतीचे कळस. कळसाचे दर्शन घेतले की देवदर्शनाचे पुण्य लाभते अशी वारकऱ्यांत समजूत आहे. पण याचा स्पष्ट अर्थ असा होतो की कळसातच देव, देऊळ व वारकरी परिवार यांचा आशय भरलेला आहे. परिणामत: तुकोबांच्या अभ्यासाच्या निमित्ताने निवृत्तिनाथ ते निळोबा हा प्रवास वारंवार होतो. दुसरे कारण असे की तुकोबांचे कार्य ज्या काळात घडले तेथपासून ते आजतागायत तुकोबा महाराष्ट्र संस्कृतीचे नायक ठरलेले आहेत. ज्यांना ज्यांना जे जे हवे होते ते ते त्यांनी तुकोबांपाशी मागितले. तसेच ज्यांना ज्यांना आपणास निरखून घ्यायचे होते त्यांनी त्यांनी ‘झाले दर्पणाचे अंग ज्याचा त्यासी दावी रंग’ या तुकोक्तीप्रमाणे तुकोबांच्या आरशात स्वत:ला निरखून घेतले. हा सोहळा आजतागायत चालू आहे. म्हणून तुकाराम दर्शन हे सर्वांचे सार्वजनिक तसेच सार्वकालीन दर्शन ठरते.

तुकाराम दर्शनाचा पैस खूप मोठा आहे. ज्ञानदेव ते आपण असा तो व्यापक आहे. पाया ते कळस व कळसाची सावली जेथपर्यंत पडते तेथपर्यंत तो पसरलेला आहे. डॉ. मोऱ्यांनी आपला हा प्रकल्प पूर्वार्ध व उत्तरार्ध या दोन भागांत विभागलेला आहे. पूर्वार्धात ज्ञानदेव ते इंग्रजी सत्तेच्या सुरुवातीपर्यंतचा कालखंड आहे तर उत्तरार्धात इंग्रजी सत्तेचा कालखंड ते विसाव्या शतकाच्या नवव्या दशकापर्यंतचा कालखंड आहे. उत्तरार्धात

समाजशास्त्राच्या अंगाने होणारे तुकाराम दर्शन, साहित्यिकांच्या दृष्टिकोनातून होणारे दर्शन, विचारवंतांच्या दृष्टिकोनातून होणारे दर्शन, वाङ्मयनिर्मिती व समीक्षा यांवरील तुकोबांच्या प्रभावानुरोधाने होणारे दर्शन असे विभाग येतात.

'दर्शन' सारख्या ग्रंथाची ही ऐसपैस मांडणी हा नवा वस्तुपाठच ठरावा. ज्ञानेश्वर दर्शन, नामदेव दर्शन, एकनाथ दर्शन वगैरे दर्शन ग्रंथांची सामुहिक प्रयत्नांतून झालेली निर्मिती व तुकाराम दर्शन या ग्रंथाची एकट्या डॉ.मोऱ्यांच्या प्रयत्नांतून पण सामूहिक शक्तीचा प्रत्यय आणून देणारी निर्मिती हेही ह्या दर्शनग्रंथाचे वैशिष्ट्य आहे.

ज्ञानदेव ते आपण या एवढ्या प्रदीर्घ कालपटातील विविध असंख्य घटनांची डॉ.मोरे केवळ नोंद करीत नाहीत. (केवळ नोंदी करतानाही दमछाक होईल) हा इतिहास केवळ घटनाप्रसंग व सनावळ्यांचा इतिहास नाही; तर विखुरलेल्या घटनाप्रसंगांची, अपभ्रष्ट अन्वयार्थाची ही पुनर्मांडणी आहे. अनेक अविश्लेष्य व अनिर्णित मुद्यांकडे डॉ.मोरे यांची नजर त्यामुळेच पोचते; व भरभक्कम चिकित्सा करून संबंधित मुद्याचे विश्लेषण करून निर्णयाप्रत ते येतात. यासाठी प्रारंभिक गोष्ट म्हणजे नीट वाचन करणे महत्त्वाचे ठरते. जुन्या वाङ्मयाच्या संदर्भात अपवाचन (misreading) हा फार मोठा धोका ठरत आलेला आहे. अपवाचनाचे कित्येक नमुने डॉ. मोरे विवेचनाच्या ओघात दाखवून देतात व त्यामुळे निष्कर्ष कसे चुकतात हेही लक्षात आणून देतात. उदाहरणार्थ तुकोबांनी आपल्या स्वप्नात येऊन 'दिधले पुस्तक मंत्रगीता' असे बहिणाबाई सांगतात. त्याचा अर्थ तुकोबांनी बहिणाबाईंना मंत्रगीता नामक गीतेवरील टीकेचे पुस्तक दिले असा वा.सी.वेंद्रे लावतात. परंतु मंत्रगीता ही देहूकर तुकारामांची नसून नगर जिल्ह्यातील

**'एकात्मभाव'**

*तुकोबांच्या कवित्वामुळे महाराष्ट्रात घडून आलेल्या परिवर्तनाचे वर्णन करताना पु. य. देशपांडे म्हणतात, 'रूढ सामाजिक जाणिवांच्या दडपणामुळे निर्जीव बनलेले असंख्याचे भाव सजीव झाले. प्रतिष्ठितांची देवळे सोडून लोक तुकारामाभोवती, अंतरीच्या देवाच्या प्रतीकाभोवती गोळा होऊ लागले. सारा दलित महाराष्ट्र व्यावहारिक जीवनाची गुलामगिरी त्राजूला सारून रंजल्यागांजल्याना जो आपला म्हणू लागला होता, त्याच्याकडे भराभर जाऊ लागला. दलितांची खडतर व रूक्ष जीवनातील स्थितिप्रधानता नाहीशी होऊन ते टाळमृदंग घेऊन तुकारामाभोवती हर्षभराने नाचू लागले. त्यांच्या आनंदाला आता पारावार उरला नाही. सहानुभूतीचा एक शब्दही ज्यांच्या कानावर पडेनासा झाला होता, त्यांच्या कानात लक्षावधी लोकांच्या मुखातून एकाच वेळी निघू लागलेला एकात्मभावाचा एकच एक रसाळ निनाद अखंड दुमदुमू लागला. तुकारामाच्याच कलात्मक वाणीने दगडी मूर्तीभोवती सारी मानवता एका नव्या जाणिवेने एकत्रित केली. असंख्य लोक एकाच जाणिवेने एकत्र येताच एकमेकांच्या जाणिवेच्या चिमुकल्या ज्योती एकजीव होऊन त्या असंख्य ज्योतिचा प्रचंड वनवा बनला. या वणव्यात सर्व मानवता-शून्य रूढ सामाजिक जाणिवा क्षणात भस्म होऊन गेल्या.'*

डॉ. सदानंद मोरे यांच्या तुकाराम दर्शनमधील (पान क्र. ६०४) 'तुकोबांचे सौंदर्य प्रतीक' या लेखामधून...

खेड्याजवळील वेगळ्या तुकारामांची आहे, हे डॉ. भा.पं. बहिरट व डॉ. रा.चिं. ढेरे यांनी सिद्ध केलेले आहे. संशोधनाचे हे दोन टप्पे. पण बहिणाबाईकृत पाठ्याचा अर्थ काय घ्यायचा हा प्रश्न अनिर्णितच राहतो. डॉ. मोरे ती जबाबदारी स्वीकारतात व त्याचे समाधानकारक स्पष्टीकरण करून निर्णय लावतात. मोरे लिहितात, माझ्या मते 'दिधले पुस्तक मंत्रगीता' या चरणाचा नीट अन्वय लावला तर हे कोडे सहजपणाने सुटते. पुस्तक, मंत्र आणि गीता या तीन गोष्टी तुकोबांनी बहिणाबाईंना दिल्या. रामकृष्णहरी हा मंत्र, भगवद्‌गीता ही गीता आणि वज्रसूची हे पुस्तक. दुसरे उदाहरण : श्री.म. माट्यांनी 'संतवाङ्मयातील रांडापोरे' या गाजलेल्या विवेचनात 'रांड' या शब्दाचे केलेले अपवाचन. 'रांड' हा शब्द निरुपद्रवी असा स्त्रीवाचक शब्द असूनही 'भाषाभिवृद्धीची सामाजिक दृष्टी' आवर्जून लक्षात घेणाऱ्या माट्यांचा गोंधळही ते लक्षात आणून देतात. अपवाचनाचे आणखी एक गंभीर उदाहरण. 'तुका करी प्रणिपात! दंडवत आचार्या' या तुकोबांच्या वचनाचा तुकोबा शंकराचार्यांना प्रणिपात करतात असा अर्थ एक वेदांती भाष्यकार लावतात. पण इथे शंकराचार्यांच्या निर्विवाद पूज्यत्वाचा प्रश्न नाही. विधानाच्या चौकटीत आचार्य हा शब्द विशेषनामवाचक नाही तर सामान्यनामवाचक आहे. तुकोबांच्या चरित्राशी व वाङ्मयाशी या बाबींचा सूक्ष्मपणे संबंध असतो व प्रत्यक्षाप्रत्यक्षपणे त्यांना ढळ पोचू शकते यामुळे नेटके वाचन महत्त्वपूर्ण ठरते हे ध्यानात यावे.

तुकोबांच्या सबंध अभंगाचे सूक्ष्मवाचन करून तुकोबांची ऊर्मी डॉ. मोरे कशी जाणून घेतात हे पहाणेही उद्‌बोधक ठरावे. यासाठी उदाहरण म्हणून 'खंडे निवडितो वेदांची' हा निबंध पहावा. डॉ. मोऱ्यांचे विवेचन साररूपाने असे: तुकोबांचा अभंग आहे: 'नव्हे वेषधारी। तुका आहाच वरावरी। आहे तैसी बरी। खंडे निवडितो वेदांची ॥' तुकोबांनी वेदांची खंडे निवडिली ती ईश्वरी प्रसादामुळे. वेदांचा विचार कसा आहे? यज्ञयागादी कर्म हे वेदांचा ब्राह्मणादी पूर्वभागात तर ज्ञान हे उपनिषदांत म्हणजे वेदांच्या उत्तरभागात निरूपित झालेले दिसते. ज्ञानाला वेदांत हे जे नाव प्राप्त झालेले आहे ते दोन्ही अर्थांनी. वेदांच्या अंतिम भागात आलेले आणि वेदांचा अंतिम निष्कर्ष असलेले. भक्तीचा विचार मात्र वैदिक वाङ्मयात दिसत नाही. तुकोबा भक्ती हा वेदांचा सारार्थ मानतात. भक्तिशिवाय ब्रह्मज्ञान सांगणारा, देवभक्तपणा खंडणारा अद्वैत वेदांती तुकोबांच्या लेखी पाखंडी ठरतो. तुकोबांनी आपणास अभिप्रेत असलेला भक्तिप्रधान वेदार्थ जागोजागी सांगितला आहे. त्यामुळे तुकोबा ऋषीच ठरतात. ऋषींना वेदांतीला मंत्र दिसले. तुकोबांना अभंग दिसले. तुकोबांची अभंगवाणी ही मंत्रशक्ती असलेली वाणी आहे. यामुळे तुकोबांचे विचार हे स्वतंत्र दर्शन ठरते. ज्ञानदेवांपासून या दर्शनाच्या मांडणीला सुरुवात झाली. तुकोबांनी ती पूर्णत्त्वास नेली. म्हणून हे तुकोबांचे दर्शन. (याही अर्थाने ग्रंथशीर्षक अन्वर्थक आहे) डॉ.मोऱ्यांनी राजारामशास्त्री भागवतांचा जो उतारा उद्‌धृत केला आहे तो अत्यंत महत्त्वाचा आहे. भागवत म्हणतात, 'ज्ञान व भक्ती या दोहोंची सांगड ज्या प्रस्थानाने घातली ते पंढरपूरचे प्रस्थान. या सातव्या प्रस्थानास आपण पुंडलिकावरून पुंडलिकाचे प्रस्थान असे नाव देऊ. या प्रस्थानातल्या लोकांचा आगत म्हटला म्हणजे ज्ञानेश्वरी व तुकारामांची गाथा... आम्हा मराठ्यास नाही श्रुतींची गरज, नाही स्मृतींची गरज, नाही भगवत्पादांच्या

वेदांतभाष्याची गरज... जसे खिस्ती लोक बायबलच्या वचनाच्या आधारे बोलतात, त्याप्रमाणे आम्हा मराठ्यास ज्ञानेश्वरांच्या किंवा तुकारामबुवांच्या वचनांचा आधार धरून काम केले पाहिजे. आम्हा मराठ्यास काशीची गरज नाही व गयेचीही गरज नाही. थोडाबहुत काही कर्मठ ब्राह्मणांचा काशीयात्रेकडे ओढा असतो; पण मराठ्यांची सार्वजनिक तिरस्थळी यात्रा म्हटली म्हणजे पंढरपूर, आळंदी व देहू... सारांश, आम्हा मराठ्यांचा आगम खरोखर मराठीत आहे, संस्कृतात नाही.

डॉ. मोरे यांनी वेदांसंबंधी विपुल चिकित्सा केली आहे याचे कारण भारतीय जीवनपद्धतीत जन्माधिष्ठित अधिकारभेदामुळे थोर थोर व्यक्तींची फारच कुंचबणा झालेली दिसते. छत्रपती शिवरायांचा राज्याभिषेक, छत्रपती शाहू महाराजांच्या संदर्भातील वेदोक्त प्रकरण, कृष्णराव अर्जुन केळुस्कर या संस्कृत भाषेतील पंडिताला उपनिषदांच्या भाषांतराचा अधिकार असण्याबद्दलचा प्रश्न तर डॉ. बाबासाहेब आंबेडकरांकडे हिंदू कोड बिल करण्याचे काम सोपविल्यावर विद्वता व कार्यक्षमता मान्य करूनही निर्माण झालेला संशय अशा या महत्त्वाच्या घटना. तुकोबांच्या 'केला सामरस्ये अभिषेक' या अभंगदर्पणात त्यांना एवढा प्रदीर्घ इतिहास दिसला. डॉ. मोरे यांच्या ठायी असलेले कालपटाचे भान, इतिहासाचे धागेदोरे जुळविण्याचे सामर्थ्य, सामाजिक वर्तनव्यवहाराची पद्धती व त्यांची सूक्ष्म चिकित्साशक्ती यांचा प्रत्यय येतो. या सर्व विवेचनाचा समारोप करताना 'एकूण अभिषेक प्रकरणात महाराष्ट्राच्या शक्तीचा अमाप अपव्यय झाला' हे कटू सत्य ते मार्मिकपणे नोंदवितात.

**'परंपरा!'**

*पाश्चात्य विचार चौकट आत्मसात करून पारंपारिक भारतीय ज्ञानाची पुनर्मांडणी त्या चौकटीत करून भारतीय परंपरा ही पाश्चात्य परंपरेपेक्षा कमअस्सल खचितच नाही; असलीच तर वरचढ असेल, असे सिद्ध करण्याचा प्रयत्न हे वसाहत काळातील भारतीय विचारवंताचे वैशिष्ट्य होय. एका बाजूला आधुनिक पाश्चात्य ज्ञानविज्ञानाच्या पूर्णपणे आहारी जाऊन भारतीय परंपरा तुच्छ व त्याज्य मानणाऱ्या न्यूनगंडाने ग्रासलेल्या भारतीय विद्वानांच्या विरोधामधील ही दुसऱ्या प्रकारची टोकाची प्रतिक्रिया होय. पण या दोन्ही बाबी एकाच नाण्याच्या दोन बाजू होत. एकाच प्रकारच्या मनोवृत्तीतून निर्माण झालेल्या त्या या प्रतिक्रिया आहेत. वरकरणी त्या कितीही भिन्न दिसल्या तरी त्यांच्यात एक प्रकारची आंतरिक सुसंगती आहे. पाश्चात्य पद्धतीचा अवलंब करून भारतीय परंपरेचे श्रेष्ठत्व प्रस्थापित करू पाहणाऱ्यांनी कळत-नकळत पाश्चात्य पद्धतीचे श्रेष्ठत्व मान्य केलेले असते. हा प्रकार समीक्षा, साहित्य, संगीत इ. अनेक क्षेत्रात पाहायला मिळतो. परंपरा अधिक स्पष्टपणे समजावी हा सुद्धा ज्ञानतृष्णेचा भाग येथे नाही, हे लक्षात घेतले पाहिजे.*

डॉ. सदानंद मोरे यांच्या तुकाराम दर्शनमधील (पान क्र. ६२४) 'तुकाराम वाङ्मयातील दुबळेपणा' या लेखामधून...

जन्माधिष्ठित अधिकारभेदापुढे कर्तृत्वाधिष्ठित, ज्ञानाधिष्ठित अधिकार कसे थिटे पडत होते हे वरील उदाहरणांतूनच कळते; पण उच्च पारमार्थिकांनाही वेदाधिकार नाकारला जात असे. तुकोबांनी या सर्वांवर मात करून 'वेदांच्या 'बा'लाच कंठी' धरले होते. पण या मागचा ध्वन्यर्थ नीट समजून घेतला नाही तर तुकोबांच्या दर्शनात कसे व्यंग राहून जाते हे डॉ. मोरे यांनी



अनुक्रमणिका






अहिताग्नी राजवाडे यांच्या तुकाराम दर्शनाच्या आधारे स्पष्ट केले आहे. अहिताग्नी राजवाडे म्हणतात, 'खानदेशातील मराठा ज्ञातीचे साधुवर्य गुलाबराव महाराज हे प्रत्युत्पन्नमति होते, पण त्यांनी कधी मर्यादा सोडून वेदाक्षर उच्चारण्याचा आग्रह धरला नाही. धर्माचा संकेत मोडून असे करणे पाप आहे असे ते म्हणत व त्याप्रमाणे आपल्या ज्ञातिबांधवांना कळकळीने सांगत. आता वेदाक्षर उच्चारण्याचा अधिकार नसला तरी त्यांना वेदांचे ज्ञान नव्हते असे नाही. संत शिरोमणी तुकारामाने म्हटल्याप्रमाणे 'वेदाचे ते ज्ञान आम्हासीच ठावे' या न्यायाने गुलाबराव महाराजही ज्ञानपूर्ण होते यात संशय नाही. राजवाडेंच्या तुकाराम दर्शनातील व्यंग स्पष्ट करताना डॉ.मोरे लिहितात. 'गुलाबराव महाराजांना आपण अधिकार नसताना उपदेश करीत आहोत याविषयी अपराधित्वाची भावना होती. तुकोबांच्या बाबतीत असे काही दिसत नाही हा महत्त्वाचा फरक आहे.' राजवाड्यांना तुकोबा हे गुलाबराव महाराजांचे पूर्वसुरी वाटले हे त्यांचे तुकारामदर्शनामधील व्यंग आहे हे ते स्पष्ट करतात.

मानवी संस्कृती ही एक सामाजिक घटना असल्यामुळे तिच्या जडणघडणीचा समाजशास्त्रीय अभ्यास करणे डॉ. मोरे आवश्यक मानतात. 'अनंतरूपी जसे लयलक्ष तुकोबाचे रंगले' या निबंधात डॉ. मोरे एखाद्या संस्कृतीच्या रचनात्मक घटकांत आंतरक्रिया कशी घडून येते ते स्पष्ट करतात. वाङ्मय व समाज यांचा परस्परसंबंध कसा घनिष्ट असतो ते उपमेय उपमान यांच्या संबंधांच्या आधारे स्पष्ट करून उपमानांचे स्थित्यंतर - वृत्यंतर ही गोष्टदेखील व्यक्तिमिषाने समाजाचे अंतरंग जाणून घ्यायला कशी उपकारक ठरते याची चर्चा करतात. तुकोबा हे भक्तीच्या व चारित्र्याच्या क्षेत्रांत आदर्श भक्तीतून जे जे स्फुरले ते ते मानदंडात्मक ठरणे स्वाभाविकच. मग ते अभंग असोत, अगर भक्तीपुढे जिथे मोक्षही तुच्छ ठरतो तर इतर गोष्टींची काय कथा? अशी तुकोबांची परम नि:स्पृहता असो.

प्रथम डॉ. मोरे यांनी स्पष्ट केलेल्या संस्कृतीच्या सामाजिक घटकांचा विचार पाहू. शिवकालापासून पेशवाईच्या अंतापर्यंत आस्तित्त्वात असलेल्या म्हणजेच राजकीय स्वातंत्र्य उपभोगलेल्या मराठी संस्कृतीचे महत्त्वाचे सामाजिक घटक म्हणजे मराठ्यांचे चार फड. भजन-कीर्तनाचा फड हा पहिला घटक. या फडात आत्मिक व नैतिक बाजूची जोपासना होत असे. राजकीय बाबींचा विचार ज्या कचेरीत होई त्यालाही फड म्हणत. शारीरिक बळाची कसोटी पाहणारा कुस्त्यांचा फड तर मनोरंजनाद्वारे लोकशिक्षण साधणारा तमाशाचा फड होता. या फड पद्धतीकडे व त्यांच्यात होणाऱ्या आंतरक्रियांकडे डॉ. मोरे यांनीच सर्वप्रथम लक्ष वेधले आहे.

कीर्तन व तमाशा या फडांतील आंतरक्रिया कशी व कोणत्या पातळ्यांवर होत असे हे कळण्यासाठी त्यांनी शाहीर प्रभाकर दातार यांच्या लावणीतील 'अनंतरूपी जसे लयलक्ष तुकोबाचे रंगले। तसे तुझे ध्यान मला रे लागले ।।' या ओळीचे विश्लेषण केले आहे. या ओळींतील उपमानाकडे ते लक्ष वेधतात. उपमान हे स्वयंसिद्ध असते. उपमानाच्या आधारे उपमेय स्पष्ट करून त्याचे ज्ञान व सौंदर्य वाढवावे लागते. उपमान हे नेणिवेतून येते. नेणिवेत रूतून बसण्याइतके ते वैशिष्ट्यपूर्ण असते. तुकोबा हे असेच नेणिवेत रूतलेले असल्यामुळे ते आदर्शाच्या स्वरूपात उपमान म्हणून प्रकटतात. वरील पंक्तीचा अर्थ डॉ. मोरे ज्या अवकाशात लावतात त्यामुळे समीक्षेचे परिमाण

वाढते. समाजशास्त्रीय समीक्षापद्धतीचे हे उत्कृष्ट प्रत्यक्षीकरण म्हटले पाहिजे.

मानवी संस्कृती ही जशी सामाजिक घटना आहे तशीच ती वाङ्मयीन घटनाही आहे. तुकोबांनी आपल्या काव्यातून जी सांस्कृतिक समीक्षा केली ती महत्त्वपूर्ण वाङ्मयीन घटनाच आहे. आपले संपूर्ण जीवनच वाङ्मयीन भाषेत समाविष्ट करण्याचा तुकोबांनी प्रयत्न केला आहे. आत्मनिष्ठा व वाङ्मयव्यवहार याचे तुकोबा मानदंडच ठरतात. यामुळेच दिलीप पुरुषोत्तम चित्रे यांना तुकोबा हे पहिले संपूर्णपणे आधुनिक कवी वाटतात. मोरोपंताच्या पंडिती कवितेपासून शाहिरी काव्य, आधुनिक कविता, मर्ढेकर, मुक्तिबोध, कुसुमाग्रज, करंदीकर, चित्रे, कोलटकर, नेमाडे, ढसाळ, इंद्रजित भालेराव प्रभुतींच्या काव्यपटात तुकोबा हे सामाजिक-सांस्कृतिक समीक्षेला साहाय्यभूत ठरलेले दिसतात. फटकळ अभंग, अनामिकाचे अभंग, नाठाळ गाथा, आततायी अभंग वगैरे अभंगांची विशेषणे समीक्षामूल्याचा प्रत्यय आणून देतात.

तुकोबांच्या व एकूणच संतकवितेचा काव्य म्हणून गंभीरपणे विचार केला तो वासुदेव बळवंत पटवर्धन यांनी. पटवर्धनांनी तुकोबांच्या कवितेची नेमकी समीक्षा करून समीक्षेत मौलिक भर टाकली आहे. डॉ. मोरे यांनी उद्धृत केलेल्या पटवर्धनांच्या काही उताऱ्यांपैकी एक प्रातिनिधिक उतारा पाहू.

'His poetry therefore has made a shrine in every heart of Maharashtra of Brahmins and Shudras alike. His verse is so familiar that I need not quote illustrative passages from his work. Suffice it to say that no other poet has contributed as many familiar quotations to the common speech of Maharashtras as Tukaram. He is more on the lips of the people than other poets.'

**'धर्मयुद्ध !'**

*डॉ. ल. का. मोहरीर यांनी तुकोबांच्या अभंगांचा अत्यंत सूक्ष्म अभ्यास केल्याचे जाणवते. तुकोबांची वाणी ही वेदवाणीच असल्याचे मोहरीर निक्षून सांगतात. विश्वरूप परमेश्वराची भक्ति तुकोबांनी शिक्षक, रक्षक, पोषक आणि सेवक या चार नात्यांनी केली. हीच त्यांची पराभक्ती असा भक्तीचा अन्वयार्थ मोहरीर यांनी लावला आहे, तो महत्त्वाचा आहे. 'तुकोबांनी जन्मसिद्ध उच्चनीच भेदभावांवर हल्ला चढविला असून त्यासाठी रात्रंदिवस युद्धाचा प्रसंगही स्वीकारला.' हे मोहरीर दाखवून देतात. त्यांच्या ग्रंथातील एक प्रकरणच मुळी 'तुकारामाचे धर्मयुद्ध' या नावाचे आहे. ते सर्वात वाचनीय प्रकरण आहे. धर्म, भक्ती, ज्ञान, कर्म, पूजा यांचे यथार्थ स्वरूप न जाणता ज्यांनी ज्यांनी स्वार्थापोटी अज्ञानाने व अपूर्ण ज्ञानाने अध्यात्मक्षेत्रात स्वमत प्रतिपादन करून ढवळाढवळ करण्याचा प्रयत्न केला, विचार प्रदूषण वाढविले, त्या सर्वांशी तुकारामांनी धर्मयुद्ध स्वीकारले आहे. हे धर्मयुद्ध कोणत्याही एका व्यक्तीशी नाही. हे युद्ध कालबाह्य विचारांशी आणि दुष्टाचाराशी आहे. अध्यात्म क्षेत्रातील बुवाबाजीशी आहे. परोक्षज्ञानी झटपटचर्चा करण्यात अग्रेसर असलेले वेदान्ती, वेदाचे रहस्य न कळलेले वेदपाठक इ. सर्वांशी तुकारामांनी भीडभाड न धरता, धनुर्धराची भूमिका स्वीकारून प्रत्यक्षपणे धर्मयुद्ध स्वीकारले आहे.*

डॉ. सदानंद मोरे यांच्या तुकाराम दर्शनमधील (पान क्र. ६३६) 'देहू आळंदीचं देह आत्म्याचं नातं' या लेखामधून...

तुकोबांच्या काव्याची समीक्षा विविध समीक्षकांनी कसकशी केली हे मोरे नोंदवतात, पण प्रत्येक शब्दप्रयोगाबाबत जागरूक राहून गरज भासेल तेथे नेमके स्पष्टीकरण करतात. वरील उताऱ्यात पटवर्धनांनी familiar quotations असा शब्दप्रयोग केला आहे. पटवर्धनांचा अर्थ स्वयंस्पष्ट आहे; पण 'सुभाषिते' हा नेहमीचा शब्द समीक्षाव्यवहारात घेतला तर गफलत होण्याची दाट शक्यता. तुकोबांच्या कवितेच्या संदर्भात तर तो अधिक सतर्कतेने समजून घेतला पाहिजे. तुकोबांची वचने ही काही केवळ सुभाषिते नाहीत. आपण आपणास अभिप्रेत अर्थाने त्यांचा चलनी वापर करतो. तुकोबांची काव्यात्म वाक्ये ही त्यांच्या अभंग या महावाक्याचा एक अखंड भाग असतात. (प्रस्तुत परीक्षणलेखकाने याची अन्यत्र विस्ताराने चर्चा केली आहे.) या संदर्भात डॉ. मोरे लिहितात. 'तुकोबांची वचने केवळ सुभाषिते नाहीत. सुभाषितांमध्ये चांगला विचार आलंकारिक भाषेत सांगितलेला असतो. त्यामुळे तो पटकन नजरेत भरतो. पक्का लक्षात राहतो. तुकोबांची वचने उत्कट आहेत. ती एकदम हृदयाला भिडतात. त्यात आलंकारिकता असली तरी खूपच कमी असते. सुभाषितांचे पाठांतर करावे लागते. ती कृत्रिम असतात. तुकोबांची वचने सहज असल्याने त्यांच्या म्हणी झाल्या. त्या पाठ कराव्या लागत नाहीत....तुकोबांचा हात धरला की खोल पाण्यात उतरावे लागते. ते आपल्याला अंतर्मुख बनवतात.' डॉ. मोरे यांनी केलेली ही चर्चा डॉ.पटवर्धनांच्या विवेचनाशी तादृश संबंधित नसली तरी सुभाषितात्मकता या शब्दप्रयोगाची तुकोबांच्या कवितेसंदर्भात खोली कळावी म्हणून विचारात घेतली.

संतांच्या आशयाभिव्यक्तीबद्दल आजवरच्या समीक्षेचा विचार करताना अनेक गफलती डॉ. मोरे मार्मिकपणे लक्षात आणून देतात. उदाहरणार्थ वा. म. जोशी यांनी एके ठिकाणी परिस्थिती आणि निर्मिती यांचा संबंध स्पष्ट करताना ज्या प्रतिकूल राजकीय परिस्थितीत तुकोबांनी निराशाजनक निवृत्तीवादी साहित्य लिहिले, त्याच परिस्थितीत रामदासांनी प्रवृत्तिवादी लिहिले असे अनैतिहासिक व विपर्यस्त विधान केल्याचे लक्षात आणून देतात. अगदी अलीकडचे उदाहरण. 'स्वातंत्र्योत्तर मराठी कविता' ह्या साहित्य अकादमीने प्रसिद्ध केलेल्या ग्रंथात संपादक तु.शं.कुलकर्णी प्रास्ताविकात गफलत करतात. कुलकर्णी लिहितात, 'प्रस्थापित वाङ्मयीन संस्कृती नाकारणारे भालचंद्र नेमाडे, दिलीप पुरुषोत्तम चित्रे, मनोहर ओक, अरुण कोलटकर, चंद्रकांत पाटील प्रभृती कवी आजच्या जीवनातील गुंतागुंतीच्या अनुभवांना सामोरे जाताना संतांच्या अभिव्यक्तीपद्धतीचा जेव्हा आग्रह धरतात तेव्हा हे कवी पुनरुज्जीवनवादी तर नाहीत ना असाही प्रश्न निर्माण होतो. वास्तवतेचे भान पचवून त्यांची कविता जर हाच आग्रह धरत राहिली तर कविता अपरिहार्यपणे बनण्याचा एक धोका मला दिसतो.' खऱ्या जीवनवादाला प्राध्यापक महाशय पुनरुज्जीवनवाद समजत आहेत अशी मार्मिक टिप्पणी करून डॉ. मोरे गफलत स्पष्ट करतात, वेळोवेळी प्रत्येक महत्त्वाच्या साहित्यिकाला तुकोबा समकालीन वाटत आलेले असूनही मराठी समीक्षा निवृत्तिवाद पुनरुज्जीवनवाद अशा भाषेत का अडकते याचा अजूनही सविस्तर विचार होणे आवश्यक वाटते. डॉ.मोरे आपल्या व्यापक प्रकल्पात ती कसर भरून काढीतच आहेत.



अनुक्रमणिका

एकोणिसाव्या शतकात मराठी प्रबोधनाच्या केंद्रस्थानी तुकोबा असल्यामुळे महाराष्ट्रातील विविध समाजसुधारणेच्या चळवळी, समाजसुधारक, प्रबोधक, विचारवंत यांनी घडवलेले (व त्यांना घडलेलेही) तुकाराम दर्शन फारच उद्‌बोधक आहे. डॉ.मोरे यांनी प्रबोधनकाळाचा आतून चिंतनशील अभ्यास केलेला असल्यामुळे फारच विस्ताराने चर्चा केली आहे. संतांच्या कार्यावर घेतला गेलेला निवृत्तीशीलतेचा आक्षेप व समाजसुधारकांचे, विचारवंतांचे संतांच्या प्रवृत्तिशील कार्याचे आकलन यात भेद पडणारच. डॉ. मोरे एका विशाल पटावरून हे सारे मांडतात. महात्मा ज्योतीराव फुले या कर्त्या सुधारकापासून ते समकालीन विचारवंतांपर्यंत मोरे चिकित्सा करीत येतात. म. फुले व संत साहित्य यांच्या संबंधाबद्दलचा गैरसमज दूर करणे हे आपले कर्तव्य मानून मोरे बुद्धिमत्तेने त्याचे स्पष्टीकरण करतात. उदाहरणार्थ तुकोबा व म.फुले यांचे नाते 'अभंग-अखंड' रचना यावरून स्पष्ट होते. (फुल्यांनी ईश्वरासाठी निर्मिक शब्द वापरला तसा 'अभंगाऐवजी' अखंड हा शब्द वापरला असे अपुऱ्या माहितीवर आधारित स्पष्टीकरण केले जाते.) 'अखंड' हा अभंगावाचक शब्द फुल्यांना तुकोबांच्याच 'अखंड न खंडे, अभंग न भंगे' या तुकोबांच्याच ओळींवरून सुचला असणार हे सूचित करतात. म. फुल्यांचा तुकोबांचा अभ्यास सूक्ष्म होता त्यामुळे वरील शक्यता नाकारताच येत नाही.

एकोणिसाव्या व्या शतकातील मराठी प्रबोधनाच्या केंद्रस्थानी असलेले तुकोबा हे विसाव्या शतकाचेही केंद्रस्थान ठरतात, हे डॉ. मोरे यांनी काही विचारवंतांचे सूक्ष्म तुकाराम दर्शन लक्षात घेऊन सिद्ध केलेले आहे. राममोहन रॉय, न्या. रानडे, ज्योतीराव फुले, लोकहितवादी, डॉ. भांडारकर, प्रि. आगरकर इ. सुधारकांनी निर्मिलेल्या बुद्धिवादी परंपरेचा अनुयायी आणि सत्यशोधकांचा चाहता समजणाऱ्या तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांचे सूक्ष्म तुकारामदर्शन डॉ. मोरे विस्ताराने घडवतात. तर्कतीर्थ जोशी यांच्या तुकारामदर्शनातील डॉ. मोरे यांनी नोंदवलेला

**'भान !'**

*वारकरी परंपरा, विठ्ठल आणि तुकोबा दिलीप पुरुषोत्तम चित्र्यांच्या कवितेमधून इतक्या विपुलतेने येतात, की अशा कवितांचाच एक वेगळा संग्रह होऊ शकेल. पण मुद्दा केवळ वैपुल्याचा नाही. कौतुकाचा तर नाहीच. वैश्विक परिप्रेक्ष्यात मराठी असण्याचे जे भान चित्रे दाखवतात, ते फार महत्त्वाचे आहे. ते केवळ वाङ्मयीन नसून, नैतिक - सांस्कृतिकही आहे. अर्थात हे भान काही त्यांना कोणी भेट म्हणून पाठविले नाही. त्यासाठी कराव्या लागलेल्या जागरूक संघर्षाच्या खुणा त्यांच्या कवितेत जागोजाग आढळतात. चित्र्यांच्या कवितेमधील युरोपीय संदर्भामुळे तिच्यावर मोहित झालेल्या आणि त्यामुळेच तिला नाक मुरडणाऱ्या अशा दोन्ही पद्धतीतील लोकांनी चित्र्यांच्या मराठीपणाकडे अक्षम्य दुर्लक्ष केलेले आहे. अर्थात त्याचे कारण आहे. चित्र्यांचा हा मराठमोळा वारकरी परंपरेशी नाते सांगणारा आहे आणि उपरोक्त दोन्ही पठड्यांमधील मंडळी एक तर युरोपियन अनुकरणवादी किंवा संत परंपरा टाळून अभिजातवादी - पुनरुज्जीवनवादी आहेत.*

डॉ. सदानंद मोरे यांच्या तुकाराम दर्शनमधील (पान क्र. ७१८) 'आधुनिक महाकवि तुकोबा' ह्या लेखामधून...

एक अंश 'हीन जातियांनी परमार्थाचा प्रसार करण्यास सुरुवात केली, म्हणजे उच्च जातियांच्या पोटात मत्सराचा गोळा उठत असे.. म्हणून पुराणांचा आधार घेऊन उच्चवर्णीय लोक आपल्या शुद्ध पांडित्याच्या योगाने हीनवर्णियांना दटावत असत. त्याचे प्रत्युत्तर तुकारामांनी दिले की, शब्दज्ञानाने पुराणाच्या अर्थाचा लोप होत आहे. मला जरी वेदाक्षर घोकण्याचा अधिकार नसला तरी 'वेदांचा तो अर्थ आम्हासीस ठावा। येरांनी वाहावा भार माथा।। यास्काने निरुक्तात अर्थमानशून्य वेदपाठकांची जी खरडपट्टी काढली आहे त्याची आठवण येते.

इतिहाससंशोधकांच्या दृष्टीतून घडलेले तुकारामदर्शन हाही या ग्रंथाचा वैशिष्ट्यपूर्ण भाग आहे. महाराष्ट्राचा इतिहास लिहिणाऱ्याची आणि विशेषत: शिवचरित्राबद्दल लिहिणाऱ्या संशोधकाची खरी कसोटी तुकाराम - रामदास - शिवाजी यांच्या संबंधांची चर्चा करताना लागते म्हणून हा विषय तुकारामदर्शनाच्या संदर्भात महत्त्वाचा मानून डॉ. मोरे चर्चा करतात. शिवरायांनी तुकोबांची भेट घेतली असता आपल्याऐवजी रामदासांना गुरु करा असा तुकोबांनी सल्ला दिल्याचे एका अनाहूत अभंगात्मक पत्राच्या आधारे सिद्ध केले जाते. वस्तुत: कुठल्याही वारकरीमान्य अभंगसंग्रहात असे पत्र नाही. पण इतिहास संशोधक सेतु माधवराव पगडी रामदासी वाङ्मयातल्या दोन तुकोबांचा शोध लावून त्यापैकी कोणा एकाचे ते असावे असा निष्कर्ष काढतात.

इतिहासाचार्य राजवाड्यांसारख्या कर्तृत्वसंपन्न संशोधकाने रामदासांचे महत्त्व वाढविण्यासाठी तुकोबांचे लघुत्वीकरण चालविले होते. खऱ्या इतिहास संशोधकाला ते अशोभनीय होते. त्याचा अनिष्ट परिणाम आजही प्रत्ययाला येतो. हेतुची शुद्धता नसताना हे करणे हास्यास्पद ठरते. त्र्यं.शं.शेजवलकर इतिहासाचार्यांच्या या कृतीची मीमांसा करताना कारणाचे क्षुल्लकत्व स्पष्ट करतात. शेजवलकर लिहितात की, 'प्रार्थना समाजाने तुकोबांचे जे महत्त्व वाढविले त्याचे प्रतिक्रियात्मक पर्यवसान राजवाड्यांनी तुकोबांना कमी लेखून रामदासांचे महत्त्व वाढविण्यात झाले.' हे सर्व प्रकार संशोधनात बसत नाहीत हे उघड आहे.

तुकाराम दर्शनातील आणखी एक महत्त्वाचा भाग म्हणजे गाथा संपादनाचा प्रयत्न. सर बार्टल फ्रियर या गव्हर्नराच्या देखरेखीखाली सर अलेक्झांडर ग्रँट यांच्या प्रेरणेने शंकर पांडुरंग पंडित व विष्णु परशराम पंडित यांच्या प्रयत्नांनी सन १८६९ साली रु. २४००० चे अनुदान प्राप्त होऊन सुरू झालेले गाथा संपादनाचे कार्य. ख्रिस्ती मंडळींनी केलेला हा तुकोबा गौरव. महिपतीकृत चरित्राचे ॲबटने केलेले भाषांतर, नेल्सन फ्रेजरने बंगालमध्ये राहून केलेले तुकोबांच्या अभंगांचे भाषांतर, सत्येन्द्रनाथ टागोरांचे बंगाली तुकाराम दर्शन, गुजराथीतले गुजराथी तुकाराम दर्शन असा हा देशविदेशातला तुकारामदर्शनाचा सोहळा मनोहरच म्हटला पाहिजे.

डॉ. मोरे अत्यंत सूक्ष्मपणे व साक्षेपाने तुकाराम दर्शन घडवतात. यामुळे अतिशय बारीकसारीक गोष्टींची ते नोंद घेतात. त्यांच्या नोंदीमुळे संबंधित गोष्टींची मौलिकता कळते. उदाहरणार्थ तुकोबांचे चित्र. प्रा. गं.बा. सरदार तुकोबांची गुणवैशिष्ट्ये सांगताना लिहितात, 'तुकाराम म्हणजे सात्त्विकतेची मूर्ती. दया, क्षमा, शांतीचा पुतळा, व्यवहारपराङ्मुखतेची

परिसीमा अशी समजूत आहे. त्यांच्या बाह्यवेषावरून त्यांच्यावर भोळसटपणाचाही कायमचा घाव बसला आहे. परंतु तुकारामांचा जीवनक्रम पहिला, वाङ्मय तपासले तर त्यात भावडेपणाचा अंशही नाही याची ताबडतोब खात्री पटते. लहानसहान व्यवहारात ते फसले असतील. छोट्यामोठ्या प्रापंचिक गोष्टींकडे त्यांचे दुर्लक्ष झालेही असेल; परंतु त्यांच्या स्वत:च्या खास क्षेत्रात त्यांच्या बुद्धीची कुशाग्रता, विचारांची सर्वंकषता, अवलोकनाची सूक्ष्मता, मनाची तीव्र संवेदनक्षमता आणि स्वभावातील आक्रमणशीलताही दिसून आल्याखेरीज राहत नाही...'

**'लाहो!'**

*आजच्या पिढीच्या आघाडीच्या कवयित्री आसावरी काकडे यांचा ताजा कविता संग्रह नुकताच प्रकाशित झाला. त्याचे नाव लाहो. हा शब्द त्यांना कोठे भेटला ? त्या सांगतात, 'लाहो म्हणजे ध्यास, तुकारामाच्या गाथेतला हा शब्द. आपल्यातील आंतरिक मर्यादांच्या पार होण्याच्या संदर्भात मला तो भावला आणि कवितासंग्रहाचे शीर्षक म्हणून मनात रूजला' मराठी कविता आणि तुकोबा यांचे इतके निकटचे नाते आहे.*

डॉ. सदानंद मोरे यांच्या तुकाराम दर्शनमधील (पान क्र. ६८९) 'झाकुनिया करिती पेरणी' या लेखनामधून...

सरदारांची उपर्युल्लिखित गुणवैशिष्ट्ये वास्तविक असल्याचे सांगून डॉ.मोरे तुकोबांचा वेष बावळा होता हे विधान पारखताना उत्तरकालिनांच्या काढलेल्या चित्राचा दोष तुकोबांना चिकटविणे निरर्थक असल्याचे स्पष्ट करतात. डॉ. मोरे यांच्या सूक्ष्म व साक्षेपी तुकारामदर्शनाला अशी चिकित्सेची जोड मिळते. जी गोष्ट चित्राची तीच प्रभातच्या 'संत तुकाराम' चित्रपटातील पागनीसांच्या भूमिकेची. पागनीसांनी उभ्या केलेल्या तुकोबांपेक्षा मुळातले तुकोबा हे कितीतरी कणखर असल्याचे ते सप्रमाण लक्षात आणून देतात.

डॉ. मोरे यांच्या सर्वच लेखनातील भाषा ही संशोधनाला परिमाण देणाऱ्या भाषेसारखी प्रौढ, गंभीर, नेमकी, ' ना मूलं लिख्यते किंचित'चा प्रत्यय देणारी आहे. पण या शिवाय संशोधकाच्या ठिकाणी असणारे युक्तिवाद चातुर्य डॉ.मोऱ्यांपाशी आहे व ते त्यांच्या बुध्दिमत्तेची-कल्पकतेची व चिंतनशीलतेची साक्ष पटवणारे आहे. त्यांच्या भाषेचा मोरे स्पर्श कळावा म्हणून पटवणारे आहे. काही उदाहरणे पाहू.

१) तुकोबा आणि इतर वारकरी संत वेदप्रामाण्याच्या संदर्भात काय भूमिका घेत होते, याचा काहीसा विचार यापूर्वी केलेला आहे. वेदप्रामाण्याची व्यापक चौकट स्वीकारून तिच्या अंतर्गत आपली स्वतंत्र चौकट निर्माण करणे आणि जेथे जेथे आणि जेव्हा जेव्हा या दोन चौकटींमध्ये विरोध निर्माण होतो तेथे तेथे व तेव्हा तेव्हा व्यापक चौकटीचा अर्थ आपल्या स्वतंत्र चौकटीला अनुकूल असा करणे, असे थोडक्यात या भूमिकेचे वर्णन करता येईल. एखादे संघराज्य असावे आणि त्याची सत्ता औपचारिकपणे मान्य करून एखाद्या घटकराज्याने जास्तीत जास्त अंतर्गत स्वायत्तता उपभोगावी, असा काहीसा हा प्रकार आहे.

२) गुरु जास्तीत जास्त ब्रह्मज्ञान देऊ शकतो. विठोबाची प्रेमखूण देण्याचे सामर्थ्य वेदांना,



अनुक्रमणिका

पुराणांना वा गुरूला नाही. ते कार्य फक्त संतच करू शकतात. प्रेमाची अवस्था श्रेष्ठ अशी अवस्था आहे. गुरू अज्ञान दूर करून ज्ञान देऊ शकतो. पण हे ज्ञान आता भक्तिप्रेमाच्या आड येते. एकनाथांनी केलेल्या रूपकाचा उपयोग करून असे म्हणता येईल की अज्ञानाचा विंचू उतरविण्यासाठी गुरु ज्ञानाचा विंचू डसवितात. त्यामुळे शिष्याच्या अंगी भिनलेले अज्ञानाचे विष उतरले खरे. परंतु आता ज्ञानाचे विष याच्या अंगी भिनते...

३) एखाद्या पहिलवानाने पवित्रे घेत, शड्डू ठोकीत आखाडाभर घुमावे; पण प्रतिस्पर्ध्याला प्रत्यक्ष भिडून एकही डाव करू नये, तसे ग्रामीण साहित्याच्या चळवळीचे झाले आहे.

४) तिळवे यांनी कवी म्हणून तुकोबांचा श्रेष्ठ दर्जा (अगदी जागतिक पातळीवर) मान्य केला आहे खरा; पण तो त्यांनी अन्य मराठी कवींना खुजे ठरवून 'सापेक्ष' केला आहे. तिळवे तुकोबांना ओसाड गावची पाटीलकी बहाल करून टाकतात.

५. मुमुक्षु कार पांगारकरांसारख्या प्रसंगी वारकऱ्यांचे वकीलपत्र घेऊन उभे राहणाऱ्या अभ्यासकांनी अंतिमत: राजवाड्यांच्याच मांडणीला बळ दिले. भागवतधर्मीय संतांची समता ही विठोबाच्या मंदिरापुरतीच होती. त्यांनी रानडे समजतात तसे सनातन धर्मामधील विषमतेविरुद्ध बंड वगैरे काही केले नाही. त्यांना चातुर्वण्य, वेदप्रामाण्य, अस्पृश्यता इ. मान्यच होते असे राजवाडे सांगतात. आता राजवाड्यांचे हे प्रतिपादन पांगारकरांना प्रमाण आहे. साक्षीदार फुटण्याच्या घटना कोर्टात घडतात, हे आपणाला ठाऊक आहे. येथे वकीलच फुटला.

डॉ. सदानंद मोरे यांना मिळालेल्या विविध पुरस्कारांच्या निमित्ताने त्यांचे हार्दिक अभिनंदन करून त्यांच्या भावी लेखन संकल्पांस मन:पूर्वक शुभेच्छा व्यक्त करू या.

□

डॉ. दिलीप धोंडगे, के.टी.एच्.एम्.महाविद्यालय नाशिक २.


## महाराष्ट्र साहित्य पत्रिका

वृत्तपत्र नोंदणी कायद्यानुसार (नमुना ४, नियम ८) द्यावयाची माहिती

**प्रसिद्धीचे ठिकाण :** महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रस्ता, पुणे ३०

**प्रसिद्धीचा काल :** त्रैमासिक

**मुद्रक आणि प्रकाशक :** राजा फडणीस

**पत्ता :** महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रस्ता, पुणे ४११ ०३०.

**राष्ट्रीयत्व :** भारतीय

**संपादक :** ह. ल. निपुणगे

**पत्ता :** महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रस्ता, पुणे ४११ ०३०

**राष्ट्रीयत्व :** भारतीय

**नियतकालिकाची मालकी :** महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रस्ता, पुणे ३०

मी असे जाहीर करतो की वर दिलेला तपशील माझ्या माहितीप्रमाणे बरोबर आहे.

राजा फडणीस

१/५/९८ प्रकाशक




अनुक्रमणिका






अनुक्रमणिका

# सुब्रह्मण्य भारती आणि स्वातंत्र्यवीर सावरकर यांची कविता : तौलनिक विचार

रवींद्र ठाकूर

तामीळ कवी सुब्रह्मण्य भारती आणि स्वातंत्र्यवीर सावरकर हे दोघेही थोर देशभक्त आणि स्वयंप्रज्ञ चतुरस्त्र साहित्यिक म्हणून प्रसिद्ध आहेत. त्यांच्या साहित्यातून राष्ट्रीय जाणिवा उत्कटपणे अभिव्यक्त झाल्या आहेत. दोघांनाही महाकाव्य न लिहिणारे महाकवी ही बिरुदे प्राप्त झालेली आहेत. कारण त्यांनी महाकाव्ये लिहिली नसली तरी महाकाव्याचा आवाका प्रकट करणारी दीर्घ काव्ये लिहिली आहेत. 'महाकाव्ये न लिहिणारे महाकवी' हे त्यांच्या उत्तुंग प्रतिभाशक्तीचेच वर्णन ठरते.

काव्य, व्यक्तित्त्व, अमाप कर्तृत्व, कवित्व यांचा इतका अन्योन्याश्रय क्वचितच आढळतो. जे कार्य त्यांच्या कृतीतून घडत होते तेच कार्य करण्यासाठी त्यांची लेखणीही प्रतिबद्ध होती. या दोघा समकालीन कवींनी एकमेकांचे साहित्य वाचलेले असण्याचा किंवा त्यांची ओळखदेखील असण्याचीही शक्यता नाही. मात्र भारती यांनी सावरकरांचे नाव ऐकले असण्याची शक्यता आहे. कारण भारती हे ज्यांना आपले गुरू मानत असत ते व्ही. व्ही. एस्. अय्यर हे सावरकरांचे स्नेही होते असे उल्लेख मिळतात. अय्यर आणि सावरकर हे इंग्लंडमध्ये काही काळ एकत्र होते. कर्झन वायलीच्या खुनानंतर जी धरपकड झाली त्यावेळी श्री. अय्यर यांनी इंग्लंड सोडले व ते पाँडिचेरी येथे आले. कदाचित याच काळात सावरकरांचे नाव भारती यांच्या कानावर आले असावे.

दोघा कवींच्या साहित्याकडे पाहिले असता असे दिसून येते की, त्यांच्या जाणिवांमध्ये कमालीचे साम्य आहे. स्वातंत्र्याची ओढ आणि पारतंत्र्यांची चीड हाच त्यांच्या कवितेचा मुख्य स्थायीभाव आहे. मुख्य म्हणजे दोघेही समकालीन राजकीय जाणिवा व्यक्त करणारे समकालीन भारतीय राष्ट्रवादी कवी आहेत. सावरकरांनी स्वतंत्रतेचे स्तोत्र लिहिले आहे तर भारती यांनी स्वतंत्रतेचे गौरवगीत लिहिले आहे. दोघांच्याही कवितेतून स्वातंत्र्याची तीच दुर्दम्य ओढ व्यक्त झाली आहे. इंग्रजांनी स्वातंत्र्य देण्यापूर्वीच भारती यांनी भारताचं स्वातंत्र्य घोषित केलं आहे. ते तामीळनाडूपुरतं बोलत नाहीत तर संपूर्ण देशाविषयीच बोलतात. सावरकरांच्या कवितेतही हीच व्यापक राष्ट्रीय जाणीव झाली आहे. दोघा समकालीन कवींच्या जाणिवांमध्ये आढळणारे हे साम्य कोणाही अभ्यासकाला तौलनिक चिकित्सेसाठी प्रवृत्त करील असेच आहे.

त्यांच्या साहित्यातील साम्यस्थळांचा विचार Reception theory किंवा Influence theory या दृष्टिकोणातून न करता राष्ट्रभक्तीच्या समान प्रेरणास्त्रोतांच्या संदर्भात करावा लागतो. समान परिस्थिती हा या संदर्भात महत्त्वाच्या घटक ठरतो. हा विचार अर्थातच उपलब्ध भाषांतरित साहित्यावर अवलंबून असल्याने तो अपरिहार्यपणेच आशयानुगामी (Thematic) ठरतो.

दोघाही कवींना आपल्या भारतीयत्वाचा ज्वलंत अभिमान असून त्यांचे संपूर्ण साहित्य आणि

जीवनकार्य राष्ट्रीय जाणिवांनी ओतप्रोत आहे. लेखकाचे व्यक्तिमत्त्व आणि साहित्य यांतील अभिन्नता येथे सहजच दृष्टोत्पत्तीस येते. अर्थात असा तौलनिक विचार करत असताना कुठल्याही दोघा लेखकांमधील साम्य हे अगदी तंतोतंत असत नाही. हे केव्हाही नजरेआड करून चालत नाही. उदाहरणार्थ सावरकर हे सशस्त्र क्रांतिवादी आहेत. तर भारती हे टिळकांच्या जहाल मतवादाचा पूर्ण आदर करणारे गांधीवादी आहेत. भारती यांना अध्यात्माची ओढ आहे तर सावरकरांना विज्ञाननिष्ठ बुद्धिवादाची आवड आहे. दोघांनाही भारतीय परंपरांचा, अद्वैत तत्त्वज्ञानाचा सारखाच अभिमान आहे; परंतु तरीही दोघे सुधारणांचा पाठपुरावा करणारे सुधारकही आहेत.

दोघा कवींचा हा तौलनिक अभ्यास त्यांच्या कवितेतून व्यक्त झालेल्या राजकीय जाणिवांच्या संदर्भात करावयाचा आहे. भारती यांचे साहित्य ही या अभ्यासाची सामग्री आहे. साहित्य क्षेत्रातल्या प्रभावाच्या संदर्भात पाहिले तर भारती हे आधुनिक तामीळ कवितेला वळण देणारे महत्त्वाचे आधुनिक कवी मानले जातात. सावरकरांच्या कवितेने मराठी काव्यप्रवाहात आपला स्वतंत्र ठसा उमटविलेला असला तरी त्यांच्या कवितेने मराठी कवितेच्या प्रवाहाला वळण दिले आहे असे म्हणता येणार नाही. उलट मराठी कवितेच्या मुख्य प्रवाहापासून त्यांची कविता काहीशी फटकून असून तिचा विचार राष्ट्रीय कवितांच्या क्षीण प्रवाहात केला जातो.

ज्या काळात भारतात राष्ट्रीय विचारांचे उष्ण वारे वेगाने वहात होते, त्या काळात निर्माण झालेल्या क्रांतिकारक राजकीय जाणिवांना सावरकर आणि भारती यांच्या कवितेत समर्थ अभिव्यक्ती मिळाली. त्यामुळे भारती यांची कविता तामिळनाडूत लोकप्रिय झाली व प्रेरक ठरली तशी सावरकरांची कविता महाराष्ट्रीय तरुण पिढीला प्रेरक ठरली. ज्या राजकीय व सामाजिक परिस्थितीने भारती यांना घडवले त्याच परिस्थितीने सावरकरांना घडवले. त्याचप्रमाणे या कवींनीही त्या काळावर आपल्या कार्याचा आणि साहित्यिक कर्तृत्वाचा अपार ठसा उमटवला. समकालीन तरुण पिढी सावरकरांच्या स्वार्थत्यागाने आणि देशासाठी त्यांनी भोगलेल्या हालअपेष्टांनी अक्षरश: भारावून गेली होती. आपणही सावरकरांसारखे तेजस्वी जगावे, देशासाठी मरण कवटाळावे हे तरुण पिढीचे स्वप्न झाले होते. सावरकरांच्या व्यक्तिमत्त्वाचे तत्कालीन तरुण पिढीला कसे आकर्षण वाटत होते याचे वर्णन विद्याधर पुंडलीक यांनी आपल्या 'आवडलेली माणसं' या ग्रंथात केले आहे. 'सप्तरंगी ज्वाला' या शब्दात त्यांनी सावरकरांच्या तेजस्वी व्यक्तिमत्त्वाचे वर्णन केले आहे.

प्रचलित मराठी कवितेची परंपरा न अनुसरता आपली स्वतंत्र वाट सावरकरांनी चोखाळली. राष्ट्रभक्ती आणि स्वातंत्र्याकांक्षेच्या ज्वलंत जाणिवांनी झगमगणारी त्यांची कविता मराठी कवितेत सहजपणे उठून दिसते. संस्कृत अभिजात कवितेशी त्यांनी आपल्या कवितेची नाळ जोडली असून त्यांच्या संस्कृत प्रचुर भाषाभिव्यक्तीतूनही त्यांची राष्ट्रवादी जाणीवच व्यक्त होत होती. कवी गोविंद यांनी सावरकरांपासून प्रेरणा घेऊन काव्यलेखनास प्रारंभ केला. इतरही आणखी काही कवींनी राष्ट्रीय कविता लिहिल्या; परंतु त्यांना सावरकरांच्या परंपरेतील कवी म्हणता येईल का हा प्रश्नच आहे. कारण सावरकरांच्या कवितेची उत्कटता त्यांच्या कवितेत आढळत नाही. दुर्गाप्रसाद

आसाराम तिवारी यांच्यासारख्या काही कवींनी राष्ट्रवादी जाणिवेतून ऐतिहासिक घटना-प्रसंगांना काव्यरूप दिले. परंतु त्या कवितांतून राष्ट्रभक्तीची उत्कट अनुभूती आढळत नाही. त्याचवेळी तामीळनाडूत मात्र भारती यांच्या कवितेची समृद्ध परंपरा निर्माण झाली आहे असे दिसून येते.

सावरकरांच्या कवितेची परंपरा निर्माण होऊ न शकण्याचे कारण सशस्त्र क्रांतिवादी चळवळीच्या पिछेहाटीत आणि म. गांधी प्रणीत अहिंसावादी सत्याग्रही चळवळीच्या प्रसारातही शोधता येईल. भारती यांना जहाल मतवादी चळवळीतील विरोधाचे तत्त्व मान्य आहे; परंतु सशस्त्र क्रांतिवादाला त्यांचा विरोध आहे. याबाबत ते गांधीवादी विचारांचे अनुयायी आहेत. सुरत काँग्रेसच्या वेळी टिळकांना साष्टांग नमस्कार करताना त्यांना धन्यता वाटते. टिळक आणि लाला लजपतराय यांच्यावर त्यांनी कविता लिहिल्या आहेत. आणि स्वातंत्र्यचळवळीत यश प्राप्त व्हावे म्हणून गांधीजींसाठी प्रार्थनाही केली आहे. सावरकरांनाही टिळकांविषयी थोर राष्ट्रीय नेते आणि आपले परात्पर गुरू म्हणून आदर असला तरी त्यांचा मार्ग टिळकांपेक्षा पूर्णपणे भिन्न होता हे स्पष्टच आहे. त्यांच्या कार्यप्रेरणेचा एक स्त्रोत जोसेफ मॅझिनी चरित्रातही शोधता येईल.

लोकमान्य टिळकांच्या मृत्यूनंतर स्वातंत्र्यचळवळीचे नेतृत्त्व म.गांधी यांच्याकडे आले. भारती आणि त्यांच्यासारखे इतर अनेक देशभक्त गांधीजींच्या नेतृत्त्वाखाली स्वातंत्र्यचळवळीत सामील झाले. सावरकरांना मात्र गांधीजींची अहिंसावादी विचारप्रणाली मान्य नव्हती. हळूहळू गांधीवादाचा प्रभाव इतका वाढत गेला की, सशस्त्रक्रांतिवादी चळवळीची पूर्ण पिछेहाट झाली.

अशा प्रकारे भारती आणि सावरकर यांच्या धोरणात काही भेद असले तरी त्यांच्या नि:स्सीम देशभक्तीविषयी कुठलाही प्रश्न उपस्थित होण्याचे कारण नाही. राष्ट्रवादाला छेद देणारी संकुचित प्रादेशिकता त्यांच्या साहित्यात कोठेही आढळून येणार नाही. दोघांनीही संस्कृत अभिजात कवितेचे संस्कार पचविले असून भारताच्या सांस्कृतिक व धार्मिक परंपरांचा सारखाच अभिमान प्रकट केला आहे.

मानवताधिष्ठित राष्ट्रवाद हे भारतीयांच्या विचारांचे मुख्य सूत्र आहे. संपूर्ण जग हे त्यांना एक कुटुंब वाटतं. एका लेखात भारती लिहितात, 'हे भारतीयांनो उठा, ऊन, वारा, पाऊस आणि भूक-तहान यांची पर्वा करू नका. तुम्ही स्वत: स्वतंत्र व्हा आणि जे गुलाम आहेत त्यांनाही स्वातंत्र्य मिळवून द्या.' गुलामी मग ती कोणतीही असो वा कोणाचीही असो तिचा त्यांना सारखाच तिटकारा आहे. स्वातंत्र्यासाठी कराव्या लागणाऱ्या त्यागाची आणि ते मिळवण्यासाठी भोगाव्या लागणाऱ्या हालअपेष्टांचीही त्यांनी तयारी दर्शवली आहे. संपत्ती या लेखात भारती लिहितात, 'दारिद्र्य, दैन्य आणि कोणत्याही प्रकारच्या अशुभापासून जगाची मुक्ती होईल असा शांततापूर्ण मार्ग आपण शोधून काढू शकलो तर ती फक्त आपल्या देशाची नव्हे तर जगाची मोठी सेवा ठरेल.' भारती केवळ देशाच्या स्वातंत्र्यासाठी तळमळत आहेत असे नाही तर जगातल्या प्रत्येक माणसाच्या स्वातंत्र्यासाठी आणि सुखासाठी तळमळत आहेत.

राष्ट्रीय एकात्मतेची जाणीव त्यांच्या साहित्यात अनेक ठिकाणी व्यक्त झाली आहे. एके ठिकाणी ते लिहितात, 'वीर मराठ्यांच्या पोवाड्यांसाठी चेर देशातील मौल्यवान हस्तीदंत भेट

म्हणून द्यावा. काशीच्या पंडितांना कांचीपुरम्‌मधील वेदघोष ऐकू यावेत. आणि राजस्थानी वीरांच्या सन्मानासाठी कर्नाटक प्रांतातलं सोनं दिलं जावं.'

राष्ट्रीय स्वातंत्र्याचा आणि एकात्मतेचा असाच अखंड ध्यास सावरकरांच्या कवितेतही व्यक्त झालेला आहे. 'सायंकाळी रानात चुकलेले कोकरू' पाहूनही त्यांच्या मनात स्वातंत्र्याचेच विचार येतात. ते लिहितात,

'स्वातंत्र्य जयांचे गेले ॥
परक्यांचे बंदी झाले ॥
त्रिभुवनी सुख न त्या कसले ॥
की खरे ॥'

ते मातृभूमीपासून दूर होते तेव्हाही मनाने तिच्या जवळच होते. इंग्लंडमध्ये असताना त्यांनी सागराला उद्देशून व्यक्त केलेले मनोगत सुप्रसिद्ध आहे. त्यांतील काही ओळी पुढीलप्रमाणे :

'ने मजसी ने परत मातृभूमीला ।
सागरा प्राण तळमळला... ॥
नभी नक्षत्रे बहुत एक परी प्यारा ।
मज भरतभूमीचा तारा ॥
प्रासाद इथे भव्य परी मज भारी ।
आईची झोपडी प्यारी ॥
तिजवीण नको राज्य, मज प्रिय साचा ।
वनवास तिच्या जरी वनीचा ॥

पारतंत्र्याविषयीची चीड त्यांच्या अनेक कवितांतून व्यक्त झाली आहे. 'भूमातेस' या कवितेत ते म्हणतात,

'माते, हे परके घरात घुसले दस्यू तुझ्या गे कसे?'

याच भूमिकेतून त्यांनी लेखकांना 'लेखण्या मोडा आणि बंदुका घ्या' असा संदेश दिला. तरुणांना उद्देशून ते म्हणतात,

'घ्या घ्या घ्या शपथा तरुणांनो मरुही देशासाठी ॥
स्वस्थ कसे बसला लागेना तळमळ का रे चिंता ॥'

'माझे मृत्यूपत्र' या कवितेत मातृभूमीविषयीचा आपला अनन्य प्रेमभाव व्यक्त करताना सावरकर म्हणतात,

'हे मातृभूमी तुजला मन वाहियले
वक्तृत्व वाग्विभवही तुज अर्पियले
तूतेचि अर्पिली नवी कविता रसाला
लेखाप्रती विषय तूचि अनन्य जाहला'

सावरकरांनी स्वतंत्रतेचे स्त्रोत्र लिहिले आहे तसे भारतीनी स्वतंत्रता देवीची कृपा व्हावी



अनुक्रमणिका

म्हणून तिचे प्रार्थनागीत लिहिले आहे. या दोन्ही गीतांतील आशय आणि अभिव्यक्ती विशेष यात आश्चर्यकारक साम्य आढळून येते. स्वातंत्र्याची तहान दोघांच्या कवितेत सारख्याच उत्कटतेने अभिव्यक्त झाली आहे, परंतु दोघेही स्वतंत्रता देवीची स्त्रोत्रे गातात हे साम्य अभ्यसनीय आहे.

'स्वतंत्रतेचे स्त्रोत्र' या कवितेत सावरकर लिहितात,

'राष्ट्राचे चैतन्य मूर्त तू नीती संपदाची
स्वतंत्रते भगवती श्रीमती राज्ञी तू त्यांची
तुजसाठी मरण ते जनन
तुजवीण जनन ते मरण'

भारती लिहितात,

'जिन्हे नही है प्राप्त तुम्हारी कृपादृष्टीका दान
वे चाहे कुबेरसेही क्यो न हो अतुल धनवान
चाहे कितने पढे गुने हो बहुश्रूत हो विद्वान
........ ....... ........
उनका जीवन व्यर्थ है उनका सब सन्मान!
एक कृपा के विना सभी गुण, सब धन धुली समान
कोई भी उपलब्धी क्यो न हो होगी वहा निष्प्राण
शव पर सजा हुआ आभूषण ही उसका उपमान'

स्वतंत्रता देवी ही त्यांना तेजरूप प्रकाशदायिनी शक्तीच वाटते. तिच्या कृपेशिवाय राष्ट्राची उन्नती अशक्य आहे यावर त्यांचा प्रगाढ विश्वास आहे. स्वातंत्र्य हे त्यांना राष्ट्राचं अंत:सामर्थ्यच वाटतं. अद्वैत तत्त्वज्ञानातील आत्मविषयक विचारांतूनही सावरकरांना स्वातंत्र्याचा घोष ऐकू येतो. ते लिहितात,

'अनादि मी अनंत मी अवध्य मी मला
मारिल रिपु जगती असा कवण जन्मला.'

सुब्रह्मण्य भारती हेही अद्वैती होते. पराशक्तीचे उपासक होते. त्यांच्या समग्र कवितेत भक्तिपर आणि अध्यात्मिक कवितेचे प्रमाण मोठेच आहे. एकंदरीत दोघा कवींवर अद्वैत तत्त्वज्ञानाचा मोठाच प्रभाव आहे हे स्पष्ट आहे. अभिजात कवितेचे कथनपरतेचे प्रमुख वैशिष्ट्य दोघांच्या कवितेने अंगीकारले आहे. म्हणूनच त्यांची शैली सुबोध आहे. सावरकरांची भाषा वा भारतींची भाषा संस्कृतप्रचुर असली तरी ती दुर्बोध नाही ती यामुळेच.

राष्ट्रीय भावना जागृत करण्यासाठी कवींना इतिहासातील दिव्यदाहक घटनांचा आश्रय घ्यावा लागणे स्वाभाविक ठरते. याबाबत भारती भारतीय इतिहासातील समकालीन व प्राचीन घटना प्रसंगांचे चित्रण करतात (उदा. पांचाली शपथम्) परंतु सावरकर मात्र मराठ्यांच्या इतिहासापलीकडे फारसे जात नाहीत असे दिसते (उदा. पानिपत आणि इतर काही पोवाडे)

आधुनिक तामिळ साहित्यावर भारती यांचा अफाट प्रभाव पडलेला आहे. त्यांना Father

of Tamil Literary Renaissance असे म्हटले जाते. सावरकर मात्र आधुनिक कवितेच्या प्रवाहापासून काहीसे फटकून आहेत. त्यांची कविता मराठी कवितेत उठून दिसते. परंतु तिला पूर्वपरंपरा नाही आणि उत्तरपरंपराही नाही. कवी गोविंद यांनी सावरकरांपासून प्रेरणा घेतली. परंतु त्यांच्या कवितेची प्रकृती सावरकरांच्या कवितेसारखी नाही. इतर कवींची राष्ट्रीय कविता ऐतिहासिक घटनांना पद्यरूप देण्यात समाधान मानते. सावरकरांच्या कवितेप्रमाणे राष्ट्रीय जाणिवेचा स्फुल्लिंग पेटवण्यात यशस्वी होत नाही.

खुद्द सावरकरांच्या कवितेतील राष्ट्रीय जाणिवा उत्तरकाळात क्षीण झालेल्या दिसतात. सावरकरांच्या कवितेची ही एक मर्यादा म्हणून सांगता येईल. तथापि ती मान्य करूनही त्यांच्या कवितेतील जहाल उत्कट राष्ट्रवादी जाणिवांची आवर्जून दखल घ्यावी लागते. सुब्रह्मण्य भारती यांच्यासारख्या कवीशी तुलना करावयाची झाली तर त्यांचे नाव घ्यावे लागते. हेच त्यांच्या कवितेचे मराठी कवितेला आणि भारतीय राष्ट्रीय कवितेला खरे योगदान आहे.

□

*गांधीग्राम विद्यापीठ मदुराई तामीळनाडू येथे 'Bharthiyar and other Indian National Poets' या परिसंवादात वाचलेला निबंध.*

□

रवींद्र ठाकूर
आम्रपाली ४२, रंकाळी पार्क, कोल्हापूर.

# ‘गांधीजी...’ डॉ.वि.रा.करंदीकर यांचे काही आक्षेप — माझी बाजू

डॉ. द. न. गोखले

म.सा.पत्रिकेच्या जुलै-ऑगस्ट-सप्टेंबरच्या २८२ व्या अंकात डॉ.वि.रा.करंदीकर यांचा ‘चरित्रकार डॉ.गोखले आणि गांधीजींचे महामानवत्व’ या नावाचा एक प्रदीर्घ समालोचनात्मक लेख प्रसिद्ध झाला आहे. त्यांत त्यांनी माझ्यासंबंधी आणि माझ्या पुस्तकासंबंधी अनेक गौरवपर उद्गार काढले आहेत. डॉ. करंदीकर माझे एक फार जुने ५७-५८ वर्षांचे दीर्घ ऋणानुबंधी मित्र आहेत. तेव्हा त्यांनी ‘गुह्यं च मूहति गुणान् प्रकटी करोति!’ ही उक्ती खरी केली असणार. पण येथे त्यांच्या गौरवासंबंधी लिहावयाचे नसून त्यांना माझ्या पुस्तकांतील जो आक्षेपार्ह भाग वाटला त्यातील काही भागाविषयी लिहावयाचे आहे. यात त्यांचे आक्षेप खोडून काढण्यास मी प्रवृत्त झालेलो नाही. मी फक्त माझी बाजूच मांडणार आहे. हे समर्थन नाही; स्पष्टीकरण आहे. स्पष्टीकरणात जर कोठे समर्थन अनुस्यूत असेल तर ते अपरिहार्य म्हणून आले आहे. समर्थन हा माझा हेतू नाही.

डॉ. करंदीकरांच्या ज्या आक्षेपांवर मी लिहिणार आहे त्या आक्षेपांचे दोन भाग पडतात. १) शब्दविषयक २) विचारविषयक. प्रथम शब्दविषयक आक्षेप घेऊ.

खटाटोप हा शब्द डॉ. करंदीकरांना काहीसा आक्षेपार्ह वाटला आहे (पृ.१४-१५). प्रयत्न हा शब्द न योजता, खटाटोप हा शब्द मी नम्रतेने योजला आहे, हे त्यांचे म्हणणे अचूक आहे. पण ‘खटाटोप याचा अर्थ व्यर्थ धडपड ! असाच होत नाही. हा शब्द मी अगडबंब प्रयत्न या अर्थी नम्रतेने वापरला आहे. तो कोशात बघून मी वापरलेला नाही. पण आक्षेप आल्यामुळे मी दाते-कर्वे कोश बघितला. तर त्याचा क्र.१ चा अर्थ ‘मोठे अवडंबर, तयारी, बेत, चळवळी’ असाच दिला असून, ‘खटाटोपी त्या’या पोटशब्दाचा अर्थ ‘पोकळ प्रदर्शन करणारा... प्रचंड पोकळ कृत्य’ असा दिला आहे.

शब्दाला अनेक अर्थकक्षा असू शकतात त्यामुळे विशिष्ट शब्द विशिष्ट अर्थानेच योजतात असे नाही. शब्द निरनिराळ्या अर्थकक्षा घेऊन आपणांसमोर येतात आणि पुनःपुन्हा तो शब्द भेटल्यावर काही अर्थकक्षा गडद होतात, तर काही पुसट राहतात. त्यामुळे, एकच शब्द अनेकजण अनेक अर्थकक्षांनी वापरू शकतात. तेव्हा, बोलणारा व विषयासंदर्भ बघून शब्दाचा अर्थ जाणून घ्यावा लागतो.

खटाटोप हा शब्द मी ‘अगडबंब प्रयत्न’ या अर्थी थोड्या नम्रतेने नि थोड्या विनोदाने वापरला आहे. ‘खटाटोप काही शब्दांच्या योजनेत डोकावून गेला आहे.’ असेही डॉ.करंदीकर म्हणतात (पृ.१५).

भावभुक्ती या शब्द योजनेत त्यांना हा खटाटोप डोकावल्यासारखा वाटतो. ते म्हणतात,

'भावास्वाद किंवा भावानुभव हे शब्द मानसिक पातळीपर्यंत पोचणारे आहेत, आणि ते अर्थपूर्ण आहेत.' खरे तर, आस्वाद म्हणजे Testing eating आणि अनुभव म्हणजे Direct perception oreognition दोन्हीचा संबंध मूलतः शरीराशी आहे, पण लक्षणेने ते दोन्ही शब्द आपण मनाशी जोडतो. भुक्ती म्हणजे eating भुक्तीचा संबंधही मूलतः शरीराशी आहे. पण तो शब्द मी भाव या मनोगुणाशी जोडला तर काय हरकत आहे? लक्षणेने तसे करता येणार नाही काय?

आस्वाद नि अनुभव यांचा संबंध आधीच मनाशी जोडलेला आहे व भुक्तीचा संबंध मी नव्याने जोडत आहे, हे खरे असेल. पण ते सहेतुकही असू शकेल. जेव्हा असे नवे शब्द तयार होतात तेव्हा एक तर लेखकाला भाषेतील परंपरागत शब्द आठवत नाहीत, किंवा आपल्या मनातील अर्थाकडे त्याला वाचकांचे लक्ष खेचून घ्यावयाचे असते, वगैरे. भुक्तीमधील शारीर अर्थात जो रसभरीतपणा आहे तो थोडा, भाव या मानसिक अनुभवात ओतावा, असा माझा प्रयत्न होता. कवितेचा आस्वाद घेणे, कवितेचा अनुभव घेणे आणि 'कविता भोगणे' यांच्यात अर्थाच्या छटेचा फरक नाही काय?

'सौंदर्यसेवन असा शब्द गोखले टाकतात, तो तर थेट सौंदर्याची नोकरी करण्याकडे किंवा सेवा करण्याकडे त्यांना नेऊन पोचवितो.'

असे डॉ. करंदीकर म्हणतात. पण 'सेव'चा एक अर्थ To Serve असा असेल तर, To Enjoy असाही एक अर्थ आहे ना? मग 'सौंदर्य-सेवनास काय हरकत आहे? सेवन म्हणजे नोकरी असाच अर्थ ज्यांच्या मनात पक्का झाला असेल, त्यांची गोष्ट वेगळी.

ऊर्जा हा शब्द 'जड पदार्थांच्या संदर्भात योग्य आहे. माणसाच्या संदर्भात योग्य वाटत नाही.' असे डॉ. करंदीकर म्हणतात (पृ.१५). पण ऊर्जस्वल हा माणसांना लागणारा शब्द भाषेत नि वापरात नाही काय? सामर्थ्य हा शब्द डॉ. करंदीकर सुचवितात. पण सामर्थ्याची अर्थकक्षा आधीच फार विस्तृत झाली आहे. सामर्थ्य जसे शरीराचे असते तसेच मनाचेही असते. जसे सत्तेचे असते तसेच मत्तेचेही असते. मी ऊर्जा शब्द इतक्या व्यापक अर्थाने वापरीत नाही. तो Energy या विशिष्ट अर्थाने वापरला आहे. मला शरीराची, मनाची, कामाची, हालचालीची, फक्त Energy सुचवायची आहे. ऊर्जेला मी दिलेला अर्थ अनेकांना मान्य झालेला दिसतो. डॉ. करंदीकरांची प्रवृत्ती परंपरागत शब्दांकडे जास्त आहे. मधून मधून परंपरागत शब्दात नवनिर्मित शब्द, आवश्यक तेव्हा, विशिष्टार्थी मिसळण्याची माझी प्रवृत्ती आहे.

'अध्यात्मवादी आणि सनातनीपणा हे दोन शब्द एकत्रित आणता येत नाहीत' असे डॉ. करंदीकर म्हणतात (पृ.१६). 'विज्ञानवादी आधुनिकता आणि अध्यात्मवादी सनातनीपणा' ही गांधीजींच्या व्यक्तित्त्वात एकरूप झाली होती' हे माझे विधान त्यांना पसंत नाही. त्यांनी अध्यात्मिकता आणि सनातनीपणा या शब्दांचे दोन विशिष्ट अर्थ मनासमोर धरले आहेत आणि ते परस्परभिन्नच नव्हे, तर दोन टोकाचे असल्यामुळे ते शब्द एकत्र येऊ शकत नाहीत असे त्यांचे म्हणणे दिसते. पण मी अध्यात्मिकता आणि सनातनीपणा यांचे विशिष्ट अर्थ मनासमोर धरले नाहीत. ते दोन शब्द प्रवृत्ती दाखवितात, असे मला वाटते. त्या प्रवृत्ती परस्परभिन्न नि दोन टोकांच्या आहेत, हे मला पूर्ण मान्य आहे. ह्या दोन्ही प्रवृत्तींची अनेक लक्षणे आहेत. या

लक्षणातील दोन्ही प्रवृत्तींची अनेक लक्षणे ज्या व्यक्तीत दिसत असतील ती व्यक्ती अध्यात्मवादी सनातनी आहे असे म्हणण्यावाचून गत्यंतर नाही. मला गांधीजींच्या व्यक्तित्त्वात या परस्परभिन्न काहीशा दोन टोकाच्या प्रवृत्ती दिसल्या, म्हणून त्यांच्यात अध्यात्मवादी सनातनीपणा होता असे मी म्हटले.

पृ.१८ वर डॉ. करंदीकरांनी म्हटले आहे, की 'अध्यात्मातील मूलभूत संकल्पना नीट ध्यानात घेतल्या नाहीत तर गोखल्यांनी काढले तसे निष्कर्श निघू शकतात. पण तेवढ्यावर ते बरोबर ठरतात असे नाही.' पण, सत्य व परमेश्वर गांधीजी एकरूप मानतात आणि परमेश्वर सर्वव्यापक आहे असेही म्हणतात. माझा युक्तिवाद असा, की परमेश्वर जर सर्वव्यापक असेल तर तो जसा सत्यात तसा असत्यातही असणार. मग तो फक्त सत्याशी एकरूप कसा? त्यावर करंदीकरांचे उत्तर असे, की 'विश्वव्यापक तत्त्व [अर्थात परमेश्वर इति मी ] साऱ्या द्वंद्वाच्या अतित आणि त्यांना अधिष्ठानभूत असते म्हणून ते र्निद्वंद्व मानले गेले आहे.' (पृ.१६). To See God face to face किंवा To lay his weary head in the lap of the Maker या गांधीजींच्या उद्‌गारांवरून गांधीजींचा देव देहधारी होता असा निष्कर्ष काढला आहे पण 'तो बरोबर नाही एवढेच म्हणून विस्तारभयास्तव येथे थांबावयास हवे' असे डॉ. करंदीकर सांगतात. सारांश, 'परमेश्वर निर्द्वंद्व मानला गेला आहे', 'माझा निष्कर्ष बरोबर नाही.' 'विस्तारभयास्तव थांबावयास हवे' असे डॉ. करंदीकरांचे म्हणणे. अध्यात्मातील परिभाषा नि मूलभूत कल्पना मी ध्यानात घेतलेल्या नाहीत, असे डॉ. करंदीकरांचे सांगणे दिसते. त्यांनी जितका अध्यात्मशास्त्राचा अभ्यास केला आहे तेवढा मी केलेला नाही, हे मला मान्य आहे. पण गांधीजींच्या परमेश्वर कल्पनेत माझ्या अल्पबुद्धीला जी विसंगती दिसली आणि जी अद्यापिही मला दिसत आहे, ती मी दाखवली. माझ्या दिसण्यात डॉ. करंदीकरांना जी चूक दिसली ती विस्तारभयास्तव ते दाखवू शकले नाहीत, हे दुर्दैव होय.

आत्मप्रस्थापना हा शब्द महापुरुषांच्याकडे लावणे डॉ. करंदीकरांना अयोग्य वाटते. 'ध्येयाच्या सिद्धीसाठी सर्वस्वाचा त्याग करणारे महापुरुष जे काही करतात त्यांचे वर्णन आत्मप्रस्थापना या शब्दाने केले, तर त्यांच्या श्रेष्ठत्वाला उणेपणा आणणारे ठरेल'असे ते म्हणतात (पृ.१८). तो शब्दच्छलच ठरेल असेही उद्गार त्यांनी काढले आहेत. त्यांच्या मते, 'आत्मप्रस्थापना या शब्दात जो आशय आहे, त्यातील भाव पूर्णपणे मागे टाकल्याशिवाय महामानवत्त्वाच्या पायरीवर चढताच येत नाही.' सेवेच्या बुडाशी जी करुणा असते ती व्यापक पातळीवर पोहोचली, आणि तिला व्यक्तिगत स्वार्थाच्या संपूर्ण त्यागाची जोड मिळाली की, तेथे महामानवत्व प्रवेशते.'(पृ.२२).

येथे हे लक्षात घेतले पाहिजे की डॉ.करंदीकरांनी योजलेली बरीचशी परिभाषा परंपरागत अध्यात्मशास्त्रातून आलेली आहे. आणि मी योजेलेली बरीचशी परिभाषा आधुनिक मानसशास्त्रातून आलेली आहे. आत्मप्रस्थापना हा शब्द Self assertion बद्दल आला असून आत्मप्रस्थापनेचे अनेक स्तर मानसशास्त्राज्ञांनी मानलेले आहेत. मानसशास्त्रात अनेक पंथ नि अनेक मते असल्यामुळे सर्वांचा एकच निष्कर्ष सांगता येणार नाही. पण जे मूलभूत प्रवृत्ती

मानतात त्यांच्यात आत्मप्रस्थापना ही मनुष्य जातीतील एक सार्वत्रिक मूलप्रेरणा मानलेली आहे. सोन्याच्या दागिन्यांनी स्वत:ला मढवून भालदार-चोपदारांच्या ललकाऱ्यात ऐटीने दरबारप्रवेश करणाऱ्या संस्थानिकात ही प्रवृत्ती असते. आणि शांतपणे विषाचा पेला पिणाऱ्या साक्रेटीसमध्येही ही प्रवृत्ती असते. मात्र संस्थानिकात ती प्रवृत्ती सामान्य स्तरावर असेल नि साक्रेटीसमध्ये ती अत्युच्च, उदात्त, उन्नीत (Sublime) पातळीवर असेल, उच्चनीच वस्तुमानात एकच परब्रह्म पाहणाऱ्या अध्यात्माला हे समजणे अवघड जाऊ नये.

येथवर शब्दयोजनेविषयी डॉ.करंदीकरांनी घेतलेल्या काही आक्षेपांचा मी विचार केला. परिघ, हुडकणे, मानवता, संघप्रेरणा वगैरे शब्दांविषयी त्यांचे आक्षेप आहेत. पण येथवर केलेल्या विवेचनावरून शब्द योजनेची माझी दिशा स्पष्ट होईल. आता त्यांच्या विचारविषयक काही आक्षेपांवर मी लिहिणार आहे.

डॉ. करंदीकर यांची महामानवत्वाची संकल्पना स्वतंत्र आहे. पृ.२३ वर ते म्हणतात, '...सेवेच्या बुडाशी जी करुणा असते ती व्यापक पातळीवर पोहोचली आणि तिला व्यक्तिगत स्वार्थाच्या संपूर्ण त्यागाची जोड मिळाली की, तेथे महामानवत्व प्रवेश करते.' पृ.१८ वर ते म्हणतात, 'आत्मप्रस्थापना या शब्दात जो आशय आहे, त्यातील भाव पूर्णपणे मागे टाकल्याशिवाय महामानवत्वाच्या पायरीवर चढताच येत नाही.' म्हणजे वरच्या पातळीची करुणा आणि व्यक्तिगत स्वार्थाचा नि:शेष त्याग ही महामानवत्वाची त्यांना अपरिहार्य अट वाटते. पृ.१८ वरच त्यांनी असे म्हटले आहे की, 'व्यक्तित्त्वाच्या मूलद्रव्यांची तपासणी करताना गोखले आत्मप्रस्थापनेपासून प्रारंभ करतात. सर्व कर्तृत्ववान पुरुषांच्या ठायी हा गुण असतो, असे त्यांनी म्हटले आहे ते योग्य आहे, पण असे म्हणावेसे वाटते की, महामानव याला अपवाद असतात.' डॉ. करंदीकर असे सुचवतात, की सामान्य माणसाचे मोजमाप घेण्यासाठी उपयोगी पडणारी फूटपट्टी असामान्य माणसांना किंवा महामानवांना लावू नये. म्हणजे, कर्तृत्ववान पुरुषांतही, आत्मप्रस्थापनेच्या अभावी, महामानव अपवाद असतात, आणि त्यांना सामान्य फूटपट्टी लावू नये. पण डॉ. करंदीकरांचे हे म्हणणे, महामानवांना वेगळी प्रजाती देण्यासारखे किंवा 'स्वंतत्र योनी' देण्यासारखे होते. मानव जसा माकडापासून वेगळा काढला गेला तसा महामानव मानवापासून वेगळा काढणे अयोग्य होय. कारण -

तसे केल्यास महामानवांच्या कृती आपल्या आकलनाबाहेर ठेवण्याची प्रवृत्ती वाढेल. संशोधनाचे क्षेत्र संकुचित होऊन श्रद्धा नि अंधश्रद्धा यांचे क्षेत्र विस्तारेल. अमूक तमूक गोष्ट आपल्याला कळत नाही, ती का?तर ती महामानवाची आहे, असे म्हणण्याकडे कल होईल. प्रश्नांशी झगडण्यापेक्षा प्रश्न महामानवाच्या उंच खुंटीवर लटकत ठेवण्याची सवय होईल. मानवी शरीर नि मन ही आपणांस पुष्कळ अज्ञात होती नि आहेतही. पण ज्ञानाची क्षितिजे वाढवीत आपण चाललो आहोत. विश्लेषण नि चिकित्सा करीत संपादित ज्ञानाचा आधार घेत प्रश्न विचारून, युक्तिवाद लढवून, ही बौद्धिक प्रगती चालली आहे. महामानव नावाची प्रजाती वेगळी काढली तर ही प्रगती होणार नाही. पूर्वी यक्ष, किन्नर, अप्सरा, देव यांच्या योनी वेगळ्या काढल्यामुळे काय झाले, ते आपणांस माहीत आहे. अंधविश्वासाच्या त्याच गर्तेत पुन्हा आपण



अनुक्रमणिका







पडणार काय?

पण, श्रद्धा वाढेल, अंधश्रद्धेला खतपाणी मिळेल, असा खरा वा खोटा धोका दाखवून मला महामानवांची स्वतंत्र प्रजाती नाकारावयाची नाही. जर आधुनिक वैज्ञानिक निकष लावून त्यांची स्वतंत्र प्रजाती पडत असेल तर खुशाल पडू द्यावी. मात्र, मला वाटते, की जोपर्यंत मानवाच्या मनाची मूलद्रव्ये, मानवाच्या शरीर-मनाची कार्यसंस्था, मानवाची देहरचना वगैरे गोष्टी महामानवातही आढळतील तोपर्यंत महामानवांना एकंदरीने मानवातच आणले पाहिजे. जर दोन प्रजाती ठरल्या तर मग वाढणाऱ्या श्रद्धेला वा अंधश्रद्धेला बुद्धिवादाने शक्य तेवढा आळा घालावा. महामानव या प्रजातीचे शास्त्रीय संशोधन करावे, आणि जो निष्कर्ष हाती लागेल त्याचा शक्य तेवढा व्यावहारिक उपयोग करावा. त्या प्रजातीच्या भावनेचे, बुद्धीचे, वागण्याचे गूढ वाटत असेल तर आपले संशोधन अपुरे समजून ते जारीने पुढे चालवावे. 'अपवाद' 'अनाकलनीय...प्रकार', 'आपल्याला समजत नाही - समजणारही नाही', 'मानवी बुद्धीच्या अतीत', उलगडा होत नाही', 'चमत्कार' वगैरे शब्द वापरून त्या गोष्टीचे कौतुक करणे आणि आश्चर्यचकित होत्साते हात बांधून स्वस्थ राहणे हे बुद्धिवादी पुरुषार्थाचे लक्षण नव्हे. खिस्त, महंमद या धर्म पुरुषांना मनोरुग्ण ठरवून त्यांची चिरफाड काही शास्त्रज्ञांनी केली आहे. ती कितपत युक्तिसंगत आहे, हे विचारकलहातून हळू हळू ठरेल. कबीर, ज्ञानेश्वर, रामकृष्ण, विवेकानंद वगैरे धर्मप्रवण व्यक्तींचे अनेक प्रकारांनी संशोधन होऊन मानवीय मूलद्रव्यांच्या कोणत्या मिश्रणातून त्यांची जीवने फुलली, ते हुडकले पाहिजे. मूलद्रव्यांचे जे मिश्रण होते ते माझ्या कल्पनेप्रमाणे - वेगवेगळ्या थोर पुरुषांत, महामानवांत वेगवेगळे असते. कोणत्या द्रव्याचे कोणत्या प्रमाणात मिश्रण झाले म्हणजे विशिष्ट थोरपणा येतो. हे त्यामुळे कळू शकेल. निरनिराळ्या थोर पुरुषांत किंवा महामानवांत निरनिराळे मिश्रण आढळू शकेल. बहुधा, थोर पुरुष किंवा महामानव हे एकाच छापाचे गणपती नसतात, त्यांची वेगळी प्रजाती होऊ शकत नाही, असा निष्कर्ष निघेल. कोणाही आधुनिक वैज्ञानिकाने महामानवांची वेगळी प्रजाती कल्पिल्याचे माझ्या माहितीत नाही.

'हिमालयाचे वैभव... त्याच्या उंचीत आहे' हे डॉ. करंदीकरांचे निरीक्षण मला मान्य आहे. पण 'बर्फाखालच्या मातीकडे न वळता गोखले गौरीशंकरापाशी थांबले असते, तर बरे झाले असते.' (पृ.३०). हे त्यांचे विधान मला मान्य नाही. त्यांच्या माझ्या दृष्टीत एक फरक आहे. हिमालयाच्या उंचीत नि वैभवात माझ्या दृष्टीत एक फरक आहे. हिमालयाच्या उंचीत नि वैभवात थक्क होऊन राहण्यापेक्षा ती उंची कशामुळे आली, असा प्रश्न मला पडेल. मग, मातीचेच थरावर थर पडल्यामुळे उंची आली हे मला कळेल, नि हिमालयाचा हिमालयपणा मातीच्या अगणित थरांत आहे, मातीच्या वेगळ्या बनावटीत नाही, हे मला उमगेल. मातीची मूलद्रव्ये शोधण्यात इतर अनेक लाभांची शक्यता असते, हे चंद्रावरील मातीपरीक्षणात गुंतलेल्या आधुनिक मानवाला सांगण्याची आवश्यकता नाही.

'महामानव कोणास म्हणावे?' असा प्रश्न मी पुस्तकाच्या प्रारंभीच उत्पन्न केला आहे.' 'गुणांनी उंच होता होता जो भूतल सोडतो नि आकाशाला भिडतो त्याला महामानव म्हणतात'










असे मी म्हटले आहे. म्हणजे 'असामान्य गुणसंपदेचा' नि गुणसंपदा कोणत्या तरी 'उच्च ध्येयापाशी अर्पण करणारा' पुरुष महामानव होय, असे माझे म्हणणे. माझी महामानवत्वाची ही संकल्पना आणि करंदीकरांची संकल्पना यांत महदंतर आहे. डॉ. करंदीकर म्हणतात, की 'नेतृत्त्व नि पराक्रम यांच्या द्वारा प्रकट होणारे कर्तृत्त्व कितीही उत्तुंग असले, तरी त्यामुळे व्यक्ती महामानव या पदवीशी पोचू शकत नाही.' (पृ.२२). त्यांच्या मते फक्त कबीर, साक्रेटीस, ज्ञानेश्वर, रामकृष्ण, विवेकानंद, वगैरे पुरुषच महामानव ठरत असावे. उच्च पातळीवर पोचणारी करुणा आणि व्यक्तिगत स्वार्थाचा नि:शेष विनाश या महामानवत्वाच्या अशक्यप्राय अटी ते पुऱ्या करीत असावे.

गांधीजी महामानव होते काय ? या प्रश्नाचे नि:संदिग्ध उत्तर डॉ.करंदीकर देत नाहीत, असे त्यांच्या लेखनावरून मला वाटते. प्रथमत: मला वाटले होते, की गांधीजींना ते महामानव म्हणतात. पण नंतर एका विदग्ध, चतुरस्र, त्यागी नि प्रांजळ लेखक कार्यकर्त्याने मला म्हटले, की 'करंदीकरांना गांधीजी महामानव वाटत नाहीत. त्यांच्या लेखावरून माझे असे मत बनले आहे. डॉ. करंदीकरांचा लेख मी पुन:पुन्हा वाचल्यावर त्यांनी गांधीजींबद्दल काहीच नक्की सांगितले नाही, असा माझा ग्रह झाला. मी गांधीजींच्या नानाविध स्वरूपातल्या आत्मप्रस्थापनेविषयी पृ. १०६ ते ११० वर विस्ताराने लिहिले आहे. गांधीजींमध्ये अजिबात आत्मप्रस्थापना नव्हती, असे डॉ. करंदीकरांचे मत असले तर वेगळे. पण ते तसे म्हणत नाहीत. आत्मप्रस्थापनेतील भाव पूर्णपणे मागे टाकल्याशिवाय महामानवत्वाच्या पायरीवर चढताच येत नाही, असे ते म्हणतात. तेव्हा गांधीजी महामानव नव्हते, असे त्यांचे मत असावे. पृ.२२-२३ वर ते म्हणतात, 'गांधीजींचा सत्याग्रह हा सुसंस्कृत समाजाला त्यांनी उपलब्ध करून दिलेला, अन्यायाच्या प्रतिकाराचा एक अभिनव मार्ग होता, आणि त्यायोगे समाज उन्नत आणि अधिक सत्त्वसंपन्न होण्याची दिशा मिळत होती, हे गोखल्यांनी टिपलेले त्याचे वैशिष्ट्य अतिशय महत्त्वाचे आहे. त्यात गांधीजींच्या महामानवत्वाचे बीज आहे, हे त्यांनी सविस्तर स्पष्ट केले आहे.' पृ.२४ वर ते हिंदु-मुस्लिम-ऐक्याच्या गांधीजींच्या प्रयत्नाबद्दल म्हणतात, की त्यांच्या वागण्यात 'विसंवाद' उत्पन्न झाला; 'आपलेच शब्द त्यांनी फिरवले' पृ.२५ वर कस्तुरबांबद्दल गांधीजींच्या वर्तनाविषयी त्यांनी म्हटले आहे, 'स्वत:ची शुद्धता (महालेपण) वृत्तपत्रातून जाहीर करण्याचा जो मोह होता त्याच्या आहारी गांधीजी गेले, असे गोखल्यांनी म्हटले आहे.' पृ.२६ वर ते सांगतात, 'लक्षावधी लोकांच्या (फाळणीच्या वेळच्या) या दुर्दशेची नैतिक जबाबदारी कोणावर पडते, असा प्रश्न गांधीजींसारख्या महामानवाला का पडला नाही, असा प्रश्न आपल्याला पडतो.' पृ.३० वर ते म्हणतात, '....१९४२ च्या छोडो भारत आंदोलनात त्यांना आपल्या [अहिंसाविषयक] भूमिकेला मुरड घालावी लागली,' 'त्या उदात्ततत्वाच्या दृष्टीने गोखल्यांनी ज्या विभूतींचा [ साक्रेटिस, कबीर, ज्ञानेश्वर, रामकृष्ण ] उल्लेख केला आहे त्यांची जीवने गांधीजींपेक्षा वरच्या कोटीतील होती.' पृ.३२ वर ते म्हणतात, 'गांधीजींच्या सद्हेतूबद्दल प्रश्नच नाही. राजकारण नि अध्यात्मकारणही एकाच वेळी साधण्याचा प्रयत्न त्यांनी केला, यात त्यांची शोकांतिका आहे.' 'डॉ. करंदीकरांची विधाने अशी केंव्हा दोषदर्शक, केव्हा गुणदर्शक,नि

केव्हा निसटती वा छेव्यापन्हूती-वजा असल्यामुळे त्यांचे नेमके मत कळत नाही. गांधीजी मानव होते, महामानवही होते, त्यांचे व्यक्तित्व गुणदोषात्मक होते, अशी भूमिका घेतली, की या सर्व विधानांची संगती लागू शकते. पण मला वाटते, की महामानव वेगळ्या कोटीतले पुरुष असतात व त्यांचे वागणे आपल्या आकलनाच्या अतीत असते, सामान्य माणसाने आपल्या बुद्धीचे डोके त्यांच्यावर आपटू नये, अशी भूमिका घेतली, की गांधीजींबद्दल निसटती विधाने करण्याचा मार्ग शिल्लक उरतो.

महामानवत्वाची माझी संकल्पना मी वर सांगितल्याप्रमाणे, पुस्तकाच्या प्रारंभीच स्पष्ट केली आहे. डॉ. करंदीकरांची संकल्पना माझ्या संकल्पनेहून फार वेगळी आहे. माझ्या संकल्पनेचा प्रत्यक्ष, स्पष्ट उल्लेख लेखात एकदाही न करता डॉ. करंदीकरांनी स्वत:ची संकल्पना मात्र सांगितली आहे व तिचे विस्ताराने उपयोजन करून दाखविले आहे. त्यांनी माझ्या संकल्पना काय आहेत ते सांगून, ती चुकीची का आहे ते विवरूनन दाखविले असते किंवा तिचे मी केलेले उपयोजन सदोष कसे आहे, त्यात विसंगती कोणत्या आहेत, ते उलगडून दाखविले असते तर बरे झाले असते. गांधीजींचे महामानवत्व हा माझ्या पुस्तकात एक प्रमुख विषय असल्यामुळे ते प्रस्तुत झाले असते. समालोचनाच्या वाङ्मयीन शिष्टाचारात ते बसले असते. पण ते स्वत:ची संकल्पनाच सांगतात, आणि ती गांधीजींना लागू पडते किंवा नाही, ते स्पष्टपणे न सांगता वाकडी वाट करून, स्वा. सावरकरांना कशी लागू पडत नाही, ते सावेश सांगतात. मला वाटते, येथे शिष्टाचारात काही गफलत होते. स्वातंत्र्यवीरांचे उत्तुंग, विविध कर्तृत्व आणि ते मातृभूमीच्या चरणावर अखंड अर्पण करीत राहण्याचे, त्यासाठी अपरंपार हाल सोसण्याचे, उदात्तत्व यामुळे ते मला अजूनही महामानव वाटतात.

महामानवाची एकच व्याख्या ठरलेली नाही. महामानवत्वाविषयी अनेक संकल्पना संभवनीय आहेत. तेव्हा, आपलीच व्याख्या बरोबर, असे म्हणणे योग्य नाही. अनेक संकल्पनांचे अस्तित्व गृहीत धरणे औदार्याचे ठरेल. महारोग्यांच्या शुश्रूषेसाठी फादर डेमियन म्हणे, त्यांच्या वस्तीत जाऊन राहिला. पुढे त्यालाही म्हणे, महारोग झाला आणि त्याला त्याचा आनंद झाला! येथे, महारोग्यांची शुश्रूषा करण्याचे आपले ध्येय पुढे पुढे गेले म्हणून उन्नत आत्मप्रस्थानेचा आनंद त्याला झाला, असे एक पक्ष म्हणेल, यावेळी त्याचा तो राहिला नव्हता, आपल्या ध्येयाशी एकरूप झाला होता, ध्येयाचा प्रसार हीच त्याची आत्मप्रस्थापना झाली होती आणि ध्येयासिद्धी हीच त्याची आत्मपूर्ती झाली होती, असे हा पक्ष म्हणेल. डॉ. करंदीकर महामानव फादर डेमियन याचा तो 'सहजाविष्कार' होता, असे म्हणतील. म्हणजे, उन्नत आत्मप्रस्थापना नि महामानवाचा सहजाविष्कार ही येथे एकरूप होतात. त्यांत फरक उरत नाही मात्र, सहजाविष्कारात 'मी' मुळीच नसतो, असे नाही. जर 'मी' नसेल तर 'अविष्कार' कशाचा आणि तो 'सहज' कसा? अमक्या तमक्या पुण्य पुरुषाच्या मनात व्यक्तिगत स्वार्थाचा लेशही उरला नव्हता, त्याच्या मीपणाचा संपूर्ण लोप झाला होता, उभ्या आयुष्यात कामभावनेने त्याच्या चित्ताला स्पर्शही केला नाही, असे आध्यात्मिक पंथात म्हटले जाते. पण ते शब्दश: खरे नसते. त्यात काव्य असते, अलंकारिक अतिशयोक्ती अनुस्यूत असते.

डॉ. करंदीकरांनी महामानवत्वाच्या संकल्पनेविषयी ज्या धर्तीवर लिहिले त्याच धर्तीवर धर्मपुरुष या संकल्पनेबद्दल मला लिहावयास हवे. तेव्हा, काहीशा संक्षेपाने लिहितो.

१) धर्मपुरुष कोणास म्हणावे, याबद्दल आपली संकल्पना डॉ. करंदीकर स्पष्ट करतात, (पृ.२७ व पृ.१७). पण सांगत नाहीत; धर्मप्रवण व्यक्तीची मला अभिप्रेत असणारी लक्षणे पृ. १३६ - १७६ वर मी विस्ताराने सांगितली आहेत, आणि 'गांधीजी हे धर्मप्रवण पुरुषाचे फार चांगले उदाहरण आहे.' असे म्हटले आहे. गांधीजींची पुढील वाक्ये पृ.१३७ - १३८ वर मी उद्घृत केली आहेत. 'For me politics bereft of religion is absolute dirt, ever to be shunned. Politics concern nations, that which concerns the welfare of nations must be one concerns of a man who is religiously inclined'. 'My devotion to Truth has drawn me into the field of politics, and I can say without the slightest of hesitation, and yet in all humility, that those who say that religion has nothing to do with politics, do not know what religion means.' गांधीजींच्या सर्व राजकीय, सामाजिक वगैरे चळवळी त्यांच्या धर्मातून उगवल्या नि विस्तारल्या होत्या, हे मी पुरावे नि युक्तिवाद यांनी दाखवून दिले आहे. (पृ.१३९-१४०, १४२ ते २५३) पण माझे हे सर्व लिहिणे डॉ. करंदीकरांच्या नजरेतून निसटले काय, कोण जाणे - गांधीजींना धर्मपुरुष ठरविताना माझ्या विधानांची ती महत्त्वाची पार्श्वभूमी होती.

३) 'सत्य आणि अहिंसा यांचा निरपवाद पुरस्कार आणि ईश्वरावरील अविचल श्रद्धा' यांवरून मी गांधीजींना 'धर्म पुरुष' म्हणतो, असे डॉ. करंदीकरांना वाटते; (पृ.२७) पण माझ्या वर सांगितलेल्या म्हणण्याची विस्तृत पार्श्वभूमी ते पाहत नाहीत.

४) फक्त आपली संकल्पना सांगून तिचे समर्थन करणे आणि ती गांधीजींना लागू पडत नाही, हे दाखवून देणे डॉ. करंदीकर करतात; पण पुस्तकांतील संकल्पना पुरी न देता आणि तीमधील सदोषत्त्व न दाखविता किंवा तिच्या उपयोजनांतील त्रुटी न उलगडता आपले समालोचन त्यांनी गांधीजींवरील टीकेने संपविले आहे. माझ्या दृष्टीने हे समालोचनात्मक शिष्टाचाराला धरून नाही.

डॉ. करंदीकर म्हणतात, 'गांधीजी सारा जन्मभर राजकारणात वावरले हे ध्यानात घेऊन धर्मशील राजकारणी किंवा राजकारणातील धर्मशील नेता असे त्यांचे वर्णन केले तर ते नेमके ठरेल.' (पृ.२७) मला हे मान्य नाही. गांधीजी जन्मभर राजकारणात वावरले, एवढे मला मान्य आहे. पण राजकारणासह त्यांच्या सर्व महत्त्वाच्या कृतींचा मूळ नि मुख्य स्रोत धर्म होता, म्हणून मी त्यांना धर्मपुरुष म्हटले आहे. त्यांच्या कृतींचे क्षेत्र ठरविणे हे माझे मुख्य काम नव्हते. मी 'व्यक्तिविमर्श' करावयास बसलो होतो आणि त्यांच्या कृतींचे मानसिक उगमस्थान पोषणयंत्रणा मला हुडकायची होती. पृ. १७७ वर मी म्हटले आहे, '...राजकीय पुढारी, समाजसुधारक वगैरे त्यांची रूपे गौण होती. त्यांचे मूळ नि मुख्य रूप धर्मपुरुष होते. त्यांचे सर्व व्यक्तित्त्व म्हणजे परमेश्वराच्या पायावर वाहिलेले फूल होते.'

शेवटी गांधीजी आणि सावरकर यांच्यासंबधी थोडे लिहिले पाहिजे. पृ.२१-२२वर डॉ. करंदीकरांनी म्हटले आहे, की 'एकदा गांधीजींना थंडी वाजत असल्याचा उल्लेख आला आहे.



अनुक्रमणिका






गोखल्यांनी म्हटले आहे, 'हीव हे निमित्त दिसते, स्पर्शाची आवड पुरविण्याची ही युक्ती असावी.' विश्लेषण फार कठोर झाले असे वाटून की काय, त्यांनी लगेच पुढे म्हटले आहे की, गांधीजींच्या 'नेणिवेतल्या मनाने' ही युक्ती सुचविली असावी. त्यांना स्त्रीचा स्पर्श हवासा वाटला असावा, असे गोखल्यांना म्हणावयचे आहे. पण सत्यवचनाच्या बाबतीत गांधीजी इतके सरळ होते की, जर त्यांच्या मनात स्त्रीच्या स्पर्शाची इच्छा असती, तर तसे त्यांनी स्वच्छपणे बोलून दाखवले असते.' पण गांधीजी सत्यवचनाच्या बाबतीत अगदी सरळ होते, हे मला मान्य आहे. मात्र, He was a very tactile person या अर्थाचे कोणाचे तरी निरीक्षण मी पुस्तकात नोंदवले आहे. स्पर्शाचा माझा उल्लेख फार कठोर झाला, असे मला वाटले नाही. गांधीजींच्या 'नेणिवेतल्या मनाने' सुचवलेली ती युक्ती असावी, असे मला खरोखरच वाटते. डॉ. करंदीकर म्हणतात, की गांधीजींना स्पर्शाची इच्छा झाली असती तर ती त्यांनी स्वच्छ बोलून दाखविली असती. पण 'नेणिवेतल्या मनात' घडलेल्या गोष्टी स्वच्छ कळतात का? बोलून दाखविता येतात का? त्यांची जाणिव असते का? 'नेणिवेतले मन' ही मानसशास्त्रातील चीज मान्य नाही का?

सॉक्रेटीस, कबीर, ज्ञानेश्वर, रामकृष्ण वगैरेंची जीवने वरच्या 'कोटीतली होती', असे डॉ. करंदीकर सांगतात. (पृ. ३०) मला सॉक्रेटीस वगैरेंची जीवने वंदनीय वाटत असली, तरी ती गांधीजींच्या जीवनापेक्षा वरच्या कोटीतील होती, असे वाटत नाही. 'केवळ अनेक क्षेत्रे ढवळली' या निकषावर मी गांधीजींना श्रेष्ठ ठरविलेले नाही. हे प्रचंड राष्ट्र तब्बल पंचवीस वर्षे मानसिक प्रगतीच्या पथावर त्यांच्यामुळे राहिले, हे मला अद्वितीय वाटते. ही 'सुवर्णतुला' आहे. वजनासाठी, गांधीजी, सॉक्रेटीस, ज्ञानेश्वर वगैरे जगद्वंद्व विभूती आहेत, आणि ताजवा माझ्यासारख्या एका सामान्य पण प्रामाणिक माणसाच्या हातात आहे. त्यात गांधीजींचा सुवर्णखंड अधिक भरला, हे लपविता कसे येईल?

मृत्युशय्येवरील पत्नीशी सावरकरांचे जे वर्तन झाले त्यावर डॉ. करंदीकरांचा रोष आहे. तो मला समजू शकतो. ते वर्तन मलाही सदोष वाटलेले आहे आणि तसे मी लिहिलेलेही आहे. डॉ. करंदीकर म्हणतात त्या ठिकाणी (पृ.पंचवीस, माझी प्रस्तावना) मी त्या वर्तनात 'असंस्कृतपणा' आहे, असा उल्लेख केलेला नाही, हे खरे आहे. पण त्या ठिकाणी सावरकरांच्या वर्तनाचे नैतिक मूल्यमापन करण्याचा प्रश्न नव्हता. काय प्रस्तुत नि काय अप्रस्तुत, याचा विचार होता. प्रस्तावनेत मी व्यक्तिविमर्शावर लिहीत होतो आणि व्यक्तिविमर्शात त्या व्यक्तीशी एकरूप होण्याचे महत्त्व सांगत होतो. सावरकर तसे का वागले असतील याचा विचार मी करीत होतो. सावरकरांशी एकरूप झाल्यामुळे 'एक' संभाव्य उत्तर मिळते, असे मला वाटले. 'सावरकरांचे रुबाबदार दर्शन या वेळी कमी झाले होते, गालफडे बसून तोंडात दाताची कवळी आली होती आणि डोक्याला टक्कल पडले होते' हे माझे शब्द डॉ. करंदीकरांनी उद्धृत केले आहेत. पण विशेष म्हणजे 'मांडीचे हाड मोडले होते' हे माझे शब्द गाळले आहेत. माझ्या मते सावरकरांना आपल्या सुडौल बांध्याची निरूपसौंदर्याची विशेष जाण होती. तेव्हा, आपले हे रूप बाहेर दिसू नये अशी त्यांची भावना असावी. त्यांच्या मनाशी एकरूप झाल्यामुळे हे मला

सुचले, असे मी म्हटले आहे. एकरूप होण्यामुळे 'व्यक्तित्त्वाचा थोडा उलगडा झाला' असे मला वाटले. यात प्रस्तुत नि अप्रस्तुत यांचा विवेक मला करता आला नाही काय? परिणामी मी प्रस्तुत तेवढे सांगितले, त्या वर्तनाचे समर्थन मी केले नाही, पण त्याचे 'एक' संभाव्य स्पष्टीकरण दिले.

डॉ. करंदीकर पुढे म्हणतात, की 'पत्नी आजारी पडली व त्यानंतर सावरकरांचे दर्शन विरूप झाले, असे घडलेले नाही' 'ते घरी पत्नीसमोर जातच असतील', तर हे गोखल्यांचे स्पष्टीकरण 'वास्तवाशी सुसंगत नाही.' (पृ.२८) पण आपले विरूप फक्त पत्नीला दिसू नये, म्हणून ते रुग्णालयात गेले नसावे, असे मी म्हटलेले नाही. आपले विरूप आपल्या घराबाहेर कोणाला दिसू नये, असे त्यांना वाटले असावे, अशा अर्थाचे माझे मूळ विधान आहे. जिना चढताना, उतरताना, मोटारीत बसताना, बाहेर पडताना, रुग्णाच्या खोलीत, रुग्णालयात अदृश्य वावरून फक्त पत्नीला ते भेटू शकले असते काय? इतर जर आपले विरूप पाहाणार तर रुग्णालयात जाऊच नये, असा विचार त्यांच्या मनात आला असावा अशी 'एक' कल्पना माझ्या मनात आली. तर माझी ही कल्पना 'वास्तवाशी सुसंगत' कशी नाही?

मनुज-मंगला बद्दल डॉ. करंदीकर म्हणतात, 'मनुज-मंगल हा विषय काव्यात सुसंगत रीतीने व्यक्त होणे पुरेसे नसते. तशा कविता इतर कवींनीही मनाच्या क्षणिक ऊर्मीत लिहिलेल्या आहेत.' (पृ.२८) पण सावरकर नुसते 'आत्मलक्षी' कवी नव्हते, तर आत्मचरित्राच्या टप्प्याटप्प्यावर आत्मवृत्तांतपर कविता लिहिणारे उग्रात्मलक्षी कवी होते. क्रान्तिमय जीवनात, इतिहास काव्यात सांगणारे कवी होते, हे ध्यानात घेतले पाहिजे. बोटीवर, एका कोठडीत, उन्हाळ्यात तळमळत असताना त्यांनी 'आत्मबल' (अनादि मी, अनंत मी) ही कविता 'कवचमंत्र' म्हणून रचली. खटल्याचा निकाल लागून आपले स्वतंत्र आयुष्य संपणार, हे भीषण भविष्य समोर दिसत असता, त्यांनी 'पहिला हप्ता' ही आत्मार्पणपर कविता देशबांधवांना पाठवली. त्यांच्या अशा इतिहास नोंदवणाऱ्या कितीतरी कविता दाखविता येतील. तेव्हा 'मनाच्या क्षणिक ऊर्मीत कविता लिहिणाऱ्या 'इतर' कवींच्या पंक्तीला सावरकरांना बसविणे योग्य नव्हे. शिवाय, तब्बल दहा वर्षे अंदमानातील यमयातना पचवून नि एकूण सुमारे २५ वर्षे ताठ मानेने कार्य करीत इंग्रजांची बंदी (कारबद्धता व स्थलबद्धता) भोगून त्यांनी स्वकल्पनेप्रमाणे मनुष-मंगला-साठी बलिदान दिले होते, कवितेतच नव्हे तर लेखात नि पत्रात शेवटपर्यंत त्यांनी मनुज-मंगलाचा पुरस्कार केला होता, हे त्यांच्या चरित्राच्या अभ्यासकांना माहीत आहे.

डॉ. करंदीकर पुढे लिहितात, 'विश्वाचिया अखिल मंगलधारणाला। बोला असे कवण भक्ष्य हुताशनाला॥ असे त्यांनी म्हटले आहे... पण ही हौतात्म्यशीलता विश्वाच्या मंगलधारणेचा मार्ग होऊ शकत नाही. अवघ्या मानवजातीच्या मांगल्याची नुसती दिशा दाखविणेही फार अवघड गोष्ट आहे. शिवाय तो रस्ता शांतीचा आहे, संघर्षाचा नाही. त्यासाठी स्वदेशाच्या सीमा ओलांडाव्या लागतात...त्यासाठी प्रेमाच्या बळावर हरएक मानव हा आपला बांधव आहे ही भावना अंत:करणात बाणून जावी लागते... सावरकर अंत:करणाने या भावनेपासून फार फार दूर होते.' (पृ.२६) सावरकरांचा मनुज-मंगलाचा मार्ग केवळ शांतीचा नव्हता, संघर्षाचाही



अनुक्रमणिका





होता, हे खरे आहे. पण ते एक जहाल क्रांतिकारक होते म्हणून नव्हे, तर विशाल विश्वाचे एक सूक्ष्म नि समावेशक विमर्शक होते म्हणून त्यांनी तो मार्ग स्वीकारला होता. विश्वाची ही वेल आजवर प्रेमाच्या वाऱ्यावर बहरत नि डुलत आली आहे आणि संघर्षाच्या, रक्तामांसाच्या खत-पाण्यावर विकासली-पोसली आहे, हे त्यांनी जाणले होते. नुसती बंधुभावाची नि अहिंसेची जपमाळ ओढीत बसणारे नि बंधुभावाला किंवा अहिंसेला शस्त्रास्त्र बलाची जोड न देणारे भोंगळ संत जगाच्या धकाधकीत चिरडले जातील; पण विचारी, व्यवहारी, चाणाक्ष पुरुष टिकतील, असा विश्वास त्यांना वाटत होता. शहाणपणाने केलेल्या संघर्षाच्या व शांतीच्या समन्वयातूनच मनुज-मंगल साधेल, असा त्यांचा निर्णय झालेला होता. तेव्हा, सावरकरांचा मार्ग मनुज-मंगलाचाच होता. मात्र, डॉ. करंदीकरांना अभिप्रेत असलेल्या मार्गाने ते जाणार नव्हते, 'मानवजातीच्या मांगल्याची नुसती दिशा दाखविणेही अवघड आहे' असे डॉ. करंदीकर एकीकडे सांगतात आणि लगेच 'तो रस्ता शांतीचा आहे' वगैरे ठाम विधानेही करतात. तेव्हा, दिशा दाखविणे फार अवघड असले तरी रस्ता त्यांना सापडलेला दिसतो, त्यांनी सावरकरांचा रस्ता चुकला, असे खुशाल म्हणावे. सावरकरांना तसे वाटत नव्हते.

गांधीजी किंवा सावरकर या महापुरुषाच्या रक्षणाला मी धावून जाण्याची गरज नाही. पण माझी बाजू उलगडावी म्हणून हा प्रपंच करावा लागला. प्रस्तुत लिखाणात मी फक्त माझी बाजू मांडली आहे. स्पष्टीकरणात जर कोठे समर्थन गुंतले असेल तर, किंवा दुसऱ्याचा अधिक्षेप झाला असेल तर, वाचकांनी मला क्षमा करावी. माझे परममित्र डॉ. करंदीकर यांचे मन दुखेल असे काही मला करावयाचे नाही. खरे म्हणजे, परिचय व समीक्षा यांनी खचलेला एवढा मोठा लेख लिहून त्यांनी माझ्यावरील मित्रऋणाचे सुखद ओझे जड केले आहे. म.सा.पत्रिकेचा हा २८२ वा अंक हाती पडल्यावर ज्या अनेकांनी मला फोन केले किंवा जे अनेक मला भेटून गेले त्यांपैकी बहुसंख्यांनी त्यांच्या लेखाचा उल्लेख केला व तो आवडल्याचे सांगितले. त्यांच्या लेखाला असीम आत्मविश्वासाचे एक ओज आहे आणि वाहात्या वक्तृत्त्वाचा एक ओघ आहे. त्यात माझी मिणमिणती बाजू दृष्टिआड होईल म्हणून हा एवढा खटाटोप केला.

□

डॉ. द. न. गोखले
रमामंगळ, २९ सहवास सोसायटी, कर्वेनगर, पुणे ४११ ०५२.

### प्रतिक्रिया : डॉ.वि.रा.करंदीकर

*'चरित्रकार डॉ. गोखले आणि गांधीजींचे महामानवत्व' या माझ्या लेखावर डॉ. गोखले यांनी आपली प्रतिक्रिया व्यक्त करणारा आणि काही स्पष्टीकरण करणारा एक लेख लिहिला. तो पत्रिकेच्या अंकात छापण्यापूर्वी संपादकांनी माझ्याकडे पाठवला आणि त्यावरील माझी प्रतिक्रिया लिहून द्यावी, असे म्हटले. डॉ. गोखले यांचा लेख मी काळजीपूर्वक वाचला. त्यावर मी पुन्हा काही लिहावयास हवे असे मला खरोखरीच वाटत नाही. त्याची आवश्यकता नाही. डॉ. गोखले आणि मी यांच्या परिचयाला व स्नेहाला पंचावन्न वर्षे उलटून गेली आहेत. संपर्क आणि सहवास सतत होत राहिला आहे. स्नेहात कधी अंतराय आलेला नाही. आम्हा दोघांमध्ये*

*काही रुचिभिन्नत्व आहे आणि एकूण दृष्टिकोणात थोडा फरक आहे, हे त्यांना आणि मला दोघांना पूर्ण माहीत आहे. या फरकाची छाया लेखनात पडणे स्वाभाविक आहे, हे तेही जाणून आहेत आणि मीही जाणून आहे. त्यांनी आपल्या म्हणण्याचे अधिक स्पष्टीकरण केले आहे. त्यांची बाजू समजण्यास वाचकांना त्याचा उपयोग होईल. त्यांच्या लेखात वृथा समर्थनाचा भाव कोठे आलेला आहे, असे मला आढळले नाही. त्यांच्या या स्पष्टीकरणावर मी पुन्हा स्पष्टीकरणात्मक असे काही लिहावयास हवे, असे मला वाटत नाही. हळूहळू अभ्यासकाला अनेक गोष्टी थोड्या फार निराळ्या स्वरूपात भावतात, तसेच गोखले आणि मी यांच्याही बाबतीत आहे व ते स्वाभाविक आहे. हे निरनिराळे दृष्टिकोन जाणून घ्यावयाचे असतात आणि तेथेच थांबावयाचे असते. निराळा दृष्टिकोण समोर आल्यामुळे आपल्या आकलनात काही भर पडते. गोखल्यांचा लेख त्या दृष्टीने मला उपयोगी पडणारा आहे. गोखल्यांनी म्हटले आहे तसे माझे मन दुखवावे, असे त्यांच्या लेखात काहीही नाही. उलट या स्पष्टीकरणाच्या अखेरीस त्यांनी माझ्या लेखाबद्दल जे मनमोकळेपणाचे स्वागतशील व कौतुकपर उद्गार काढले आहेत, त्यामुळे माझे मन एकाच वेळी सारे काही भरून पावले आहे आणि एवढ्या प्रशस्तिपत्रास मी पुरा पडू शकणार नाही या जाणिवेमुळे आतल्या आत संकोचून गेलो आहे. अशा अवस्थेत मी अधिक काय म्हणू शकणार?*

□

डॉ.वि.रा.करंदीकर
१३, क्षिप्रा सहनिवास, कर्वेनगर, पुणे २९.

# श्री ज्ञानदेवांच्या अभंगांचा नवा चिकित्सक अभ्यास

डॉ. दत्तात्रय पुंडे

श्री ज्ञानेश्वरांचे चरित्र आणि कार्य, विशेषत: त्यांचे वाङ्मय यासंबंधी अभ्यासकांनी सतत वाद घातलेले आहेत आणि त्यात काहीही गैर नाही. कारण ज्ञानेश्वरादी संतांचे महानपण मान्य करूनही त्यांच्या वाङ्मयाबाबत चर्चाचिकित्सा करता येते, करावीच लागते. मुख्य म्हणजे मध्ययुगीन परंपरा ही मौखिक परंपरा असल्याने कोणत्याही मूळ वाङ्मयीन कृतीत फेरबदल झालेले असण्याची शक्यता गृहीतच धरावी लागते. त्यानंतर प्रतलेखकांच्या हस्तदोषामुळे, ग्रह-आग्रहामुळे आणि क्वचित प्रसंगी अज्ञानामुळेही मूळ संहितेत बदल झालेले दिसतात. त्यामुळे मध्ययुगीन मराठी वाङ्मयातील कोणत्याही एका वाङ्मयीन कृतीचे मूळ रूप काय होते, हा प्रश्न संशोधकांच्या आणि अभ्यासकांच्या चिकित्सेचा, वादविवादाचा होणे क्रमप्राप्तच असते. श्रीज्ञानेश्वरांच्या 'ज्ञानदेवी' आणि 'अमृतानुभवा'बाबत बरीच चर्चाचिकित्सा, बरेच वादविवाद झालेले आहेत. परंतु ज्ञानेश्वरांचे किंवा ज्ञानेश्वरांच्या नावावर म्हणून जे अभंगवाङ्मय आहे, त्याची शोधचिकित्सा फारच कमी झालेली आहे.

वास्तविक अशी शोधचिकित्सा व्हायलाच हवी अशी परिस्थिती बरोबर शंभर वर्षांपूर्वी निर्माण झाली होती. कै. शिवराम एकनाथ भारदे यांनी भारद्वाज या नावाने १८९७-९८ साली एक लेखमाला 'सुधारका'त लिहिली आणि 'ज्ञानेश्वर एक की दोन' हा वाद सुरू होऊन महाराष्ट्रात त्यावेळी खळबळ माजली. ही खळबळ इतकी प्रचंड होती की न्यायमूर्ती म.गो.रानडे यांच्यासारख्या थोर व्यक्तीला त्या वादात उतरून काही भूमिका घ्यावी लागली. मुख्य मुद्दा हा की अभंगरचना करणारे ज्ञानेश्वर हे कुणी वेगळे असावेत, असा निष्कर्ष काढला जावा, इतपत श्रीज्ञानेश्वरांच्या गाथ्यातील अभंग वादग्रस्त आहेत. त्यामुळे या गाथ्याची चिकित्सा लगोलग व्हायला हवी होती. कोणते अभंग खरोखरीच ज्ञानेश्वरांचे असू शकतील, कोणकोणते अभंग निश्चयाने ज्ञानेश्वरांनी रचलेले नाहीत असे म्हणता येईल, कोणते अभंग मौखिक परंपरेमुळे फेरबदल झालेले असे असतील इत्यादी स्वरूपाची चर्चा व्हायला हवी होती. ज्ञानेश्वरांकडेच ज्यांचे रचनाकर्तृत्व निश्चयाने देता येईल अशा अभंगांची निवड, संकलन आणि संपादन होणे आवश्यक होते. परंतु हे काम कोणीच मनावर घेतलेले नव्हते. ज्ञानेश्वरांच्या अभंगात खूप प्रमाणावर भेसळ आहे आणि केवळ श्रीज्ञानदेवकृत अभंगांची गाथा सिद्ध होणे आवश्यक आहे, गरजेचे आहे, असे मात्र अनेक विद्वान व अधिकारी अभ्यासक गेली शंभर वर्षे वेळोवेळी म्हणत होते.

अशा या बहुचर्चित पण सदैव दुर्लक्षित कामाला डॉ.मु.श्री.कानडे आणि श्री.रा.शं.नगरकर या दोन संशोधकांनी हात घातला, काही वर्षे त्यावर काम केले आणि १९९५ च्या मे महिन्यात











'श्रीज्ञानदेवांचा सार्थ चिकित्सक गाथा' हा आपला अभ्यासग्रंथ प्रकाशित केला. या ग्रंथाचे चार विभाग आहेत. पहिला विभाग सुमारे ७० पानांइतक्या दीर्घ प्रस्तावनेचा आहे. त्यात संपादकांनी अभंगनिवडीमागील आपली भूमिका आणि अभंगनिश्चितीची सूत्रे साधार सांगितलेली आहेत. दुसऱ्या विभागात संपादकांनी ज्ञानेश्वरांचे म्हणून स्वीकृत केलेले अभंग आहेत. तिसऱ्या भागात अस्वीकृत अभंग दिलेले आहेत. चौथा भाग विविध परिशिष्टांचा आहे. त्यात स्वीकृत आणि अस्वीकृत अभंगांची निरनिराळी सूची दिलेली आहे आणि स्वीकृत अभंगातील कठीण शब्दांचा कोशही समाविष्ट आहे.

अर्थातच या पुस्तकाला संपादकद्वयाने जी प्रस्तावना लिहिलेली आहे, ती अतिशय महत्त्वाची आहे. एखाद्या संशोधित ग्रंथाला ज्या प्रकारच्या वैचारिक शिस्तीची प्रस्तावना असावी लागते, तशीच प्रस्तावना डॉ. कानडे व श्री. नगरकर या दोघांनीही लिहिलेली आहे. तिच्यातील अनेक मुद्दे, प्रतिपादने व निष्कर्ष वादग्रस्त आहेत, यात शंकाच नाही. पण वाद उपस्थित करण्याचे बळ आहे म्हणूनच ही प्रस्तावना मौलिक ठरते. कारण तिच्या आधारे आपण अंतिम सत्याच्या दिशेने वाटचाल करू शकतो.

संपादकांनी अभंग स्वीकृतीचे अस्वीकृतीचे जे काही निकष स्वीकारले आहेत, त्याची बरीच चर्चा त्यांनी आपल्या प्रस्तावनेत केली आहे. हे निकष साधारणपणे,

१) अभंगातील कर्त्याची नाममुद्रा, २) अभंगरचनेचा घाट ३) अभंगात येणारे प्रतिपादन किंवा विषय, ४) अभंगातील शब्द (उदा. फारसी व अन्यभाषिक इ.) ५) अभंगाच्या कडव्यांची किंवा ओळींची संख्या ६) अभंगातून दिसणारे ज्ञानदेवांचे व्यक्तिमत्त्व किंवा त्याविरोधी जाणारा आशय ७) अभिरुची, ८) अर्थवत्ता इ. स्वरूपाचे आहेत.

या निकषांचे वर्गीकरण केले तर असे म्हणता येते की संपादकांनी ज्ञानेश्वरांचे व्यक्तिमत्त्व, अभंग या रचनाप्रकाराची ज्ञानेश्वरकालीन वैशिष्ट्ये आणि अभंगांमध्ये येणारे विषय या तीन गोष्टींची अनेक रीतीने (जवळ जवळ १७ निकषांच्या आधारे) पाहाणी केलेली आहे.

आपल्या या पाहाणीच्या आधारे संपादकांनी ज्ञानेश्वरांच्या उपलब्ध ११०६ अभंगांपैकी ३७६ अभंगच ज्ञानेश्वरांचे म्हणून स्वीकारलेले आहेत आणि उर्वरित ७३० अभंग ज्ञानेश्वरकृत नाहीत असा निर्वाळा देऊन नाकारलेले आहेत.

संपादकांनी स्वीकारलेली सूत्रे; त्या सूत्रांची प्रत्यक्ष अंमलबजावणी करण्याची त्यांची पद्धत आणि त्यातून त्यांनी अभंगांच्या स्वीकृती, अस्वीकृतीबाबत काढलेले निष्कर्ष सर्वांना पटतीलच असे नाही. ते सारे पटावे असा संपादकांचाही दावा दिसत नाही. त्यांनी त्यांचा एक प्रयत्न नम्रपणे अभ्यासकांसमोर ठेवलेला आहे, इतकेच काय ते खरे. त्यामुळेच एक खूप दिवस रेंगाळलेले काम त्यांनी काही एक शास्त्रीय पद्धती स्वीकारून केले, याबद्दल दोघेही संपादक अभिनंदनास निश्चितच पात्र आहेत. हा ग्रंथ भाविकांसाठी नाही. तो केवळ संशोधनपर आहे. त्यामुळे उणीपुरी ५६० पाने असणारा हा ग्रंथ आजच्या काळात प्रसिद्ध केल्याबद्दल प्रकाशक श्री अ.सि. पुराणिक यांनाही धन्यवाद द्यावयास हवेत.

या ग्रंथाचे निमित्त करून अभ्यासक जर ज्ञानेश्वरांच्या मूळ अभंगांची चर्चाचिकित्सा करतील



अनुक्रमणिका






तर दोन्ही संपादकांचे बौद्धिक मंथन आणि काही वर्षांचे परिश्रम सार्थकी लागतील, असे म्हणता येईल.

***श्रीज्ञानदेवांचा सार्थ चिकित्सक गाथा***

*संपादक : डॉ.मु.श्री. कानडे व श्री. रा.शं. नगरकर, प्रकाशक : श्री.अ.सि.पुराणिक, सुविद्या प्रकाशन, १४९ शनिवार, पुणे ३०, पृ. ८०+४८०; मूल्य ३०० रुपये.*

◻

*डॉ. दत्तात्रय पुंडे, ४/९ अर्चनानगर, एरंडवन, पुणे ४११ ०३८.*

---

## साभार पोच

- **तिन्हीसांजा :** डॉ.सुधा कांकरिया, पृष्ठे ३०, प्रकाशक : विमल प्रकाशन, पुणे
- **याची देही याची डोळा :** डॉ.सुधा कांकरिया, प्रकाशक : विमल प्रकाशन, पुणे, पृष्ठे १४०
- **रक्त चांदणे :** विश्वराज जोशी, प्रचार प्रकाशन, कोल्हापूर, पृष्ठे २८
- **सुजलाम् सुफलाम् :** प्र.अ.पुराणिक, आशिष प्रकाशन, धुळे पृष्ठे ३२
- **झुंबर आसवांचे :** प्रकाश गव्हाणे, मृदगंधा प्रकाशन, पुणे. पृष्ठे ५०
- **कागदी घोडे :** वसंत मिरासदार, सुपर्ण प्रकाशन, पुणे. पृष्ठे १४६
- **बेल भंडार :** गोविन्द काळे, गंगा प्रकाशन, सोलापूर. पृष्ठे १०४
- **मोरो केशव दामले व्यक्ती व कार्य :** कृष्ण अर्जुनवाडकर, राज्य मराठी विकास संस्था, मुंबई. पृष्ठे १०५
- **सत्य :** सौ.शामला म. काणे, गमभन प्रकाशन, पुणे. पृष्ठे १२०
- **द.ग.गोडसे यांची कलामीमांसा :** वैद्य वसंत पाटणकर, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई. पृष्ठे १७०
- **फुलवेल :** इंदिरा संत, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, पृष्ठे ६०
- **स्नेहसोबती :** सुनिल सावंत, चिंतामणी साहित्य प्रकाशन संस्था, सावंतवाडी. पृष्ठे १२८
- **मैत्रिण :** सुनिल सावंत साईनाथ प्रकाशन मुंबई पृष्ठे ७२
- **आपला सातारा :** अंजली बहुलेकर, मावळा प्रकाशन, सातारा, पृष्ठे १८०
- **कळप :** राजन गवस, शब्दालय प्रकाशन, श्रीरामपूर, पृष्ठे ३९५
- **चावडी :** शब्बीर मुलाल, मृद्गंधा प्रकाशन, पुणे. पृष्ठे ६८
- **सुखाचा परिमल :** निर्मलकुमार फडकुले, सुविद्या प्रकाशन, सोलापूर. पृष्ठे १६७
- **नोडायगोनल :** सौ. रेखा म.करमळकर, इसाप प्रकाशन, नांदेड. पृष्ठे ८८



अनुक्रमणिका

# काव्यानंद

स्नेहसुधा कुलकर्णी

गेल्या पाव शतकाचा कवितेचा इतिहास पाहता, कविता चहुअंगाने बहरते आहे असे दृश्य दिसते. कवितेचा हा बहर सुंदर, सौष्ठवपूर्ण आणि अर्थघन आहे हे विशेष. अलिकडे प्रकाशित होणाऱ्या काव्यसंग्रहांची संख्या दिवसेंदिवस वाढतेच आहे. हे सर्व संग्रह आणि या संग्रहांमधील सर्वच कविता प्रशंसनीय नाहीत हे खरे; पण स्थूलमानाने आजच्या कवितेचा आढावा घेता असे दिसते की, गेल्या पंचवीस वर्षांत कवितेची संख्याच वाढत आहे असे नाही तर काव्य अधिक प्रगल्भ, अकृत्रिम झाले आहे. कवितेला स्वत:चा असा चेहरा आता गवसला आहे. तिला अभिव्यक्तीसाठी स्वत:ची भाषा सापडली आहे. कृत्रिम सजावट आणि शब्दांचे अवडंबर यातून मुक्त झालेली आजची कविता थेट मनाला भिडणारी, अल्पाक्षरी असूनही आशयघन आहे.

आजच्या व्यामिश्र मानवी जीवनाचे प्रतिबिंब या कवितेत आहे; आजचा कवी अनेक अनुभवांना सुजाणपणे सामोरा जातो. या औद्योगिक आणि यांत्रिक युगात निव्वळ भावडेपणाने जगणे त्याला शक्यच नाही. आपल्या आजुबाजूस घडणाऱ्या राजकीय आणि सामाजिक घटनांपासून तो अलिप्त राहू शकत नाही. स्वत:च्याच भावनांना कुरवाळत बसणे त्याला शक्य नाही, पसंतही नाही. आजुबाजूचा समाज, या समाजात घडणाऱ्या बऱ्या-वाईट घटना आणि अटळ सामाजिक शोषण यामुळे तो कधी निराश होतो, वैफल्यग्रस्त होतो तर कधी व्यक्तिस्वातंत्र्यानंतर येणाऱ्या बंधनांना झुगारून अफाट अस्मानात अनिर्बंध झेप घेण्याची उमेद धरतो. कारण मानवी जीवनाची गंभीर जाणीव त्याला आहे; त्याचबरोबर दैववादाच्या कुबड्या टाकून दिल्यामुळे आणि ईश्वरी सत्तेपुढे शरणागत होण्याची वृत्तीभोक्तीची पकड सैलावल्यामुळे तो समर्थ झाला आहे, जीवनवादी झाला आहे म्हणूनच अस्तित्ववादाची छाप आजच्या कवितेवर आहे.

आजची दलित कविताही केवळ आपल्या मूकव्यथा व्यक्त करण्यावर समाधानी नाही, ती सामाजिक न्यायाला आवाहन करते, शोषणमुक्तीचा अर्थ समजावून सांगते. आपला आक्रस्ताळेपणा टाकून प्रसंगी ती उपरोधपूर्ण पण समंजस झाली आहे.

आजच्या कवयित्रींची कविताही सामाजिक व्यवस्थेचा, या व्यवस्थेतील अन्यायाचा धीटपणे उल्लेख करताना दिसते. मात्र बऱ्याच वेळा ही कविता कुटुंबव्यवस्था, समाजव्यवस्था यांमधून स्त्रीवर होणारा अन्याय व तिची अगतिकता व्यक्त करून थांबते, तर क्वचित या अगतिकतेवर मात करून, अन्यायाविरुद्ध झगडण्याची उमेद व्यक्त करते.

एकूण आजची कविता काळाबरोबर पावले टाकत आहे, प्रसंगी काळाच्या पुढे दोन पावले जाण्यासाठी प्रयत्नशील आहे, आजच्या कवितेचे स्वरूप मला तरी आशादायक वाटते.



अनुक्रमणिका







## मानवी अस्तित्त्वाचा शोध!

'रानगूज' हा श्री. शरद चुयेकर (कुलकर्णी) यांचा हा दुसरा कवितासंग्रह, १९९५ मध्ये 'अमृतवेल' हा त्यांचा पहिला काव्यसंग्रह पुष्पक प्रकाशनाने प्रकाशित केला आहे आणि तो गाजलाही आहे. रंगतसंगत प्रतिष्ठानचा १९९६ चा 'काव्यशिल्प' पुरस्कार 'अमृतवेल'ने पटकाविला आहे.

'अमृतवेल'प्रमाणेच चुयेकरांच्या या कविताही मानवी जीवनाचा अर्थ आणि कृतार्थ शोधताना दिसतात. चुयेकर ईश्वरनिष्ठ आहेत. जगातील सत्य-शिवांवर त्यांची श्रद्धा आहे. मनुष्यजन्म मिळाला आहे तर सत्कर्म करून जीवन सार्थकी लावावे आणि धरित्रीचे ऋण मनात ठेवावे, अशी त्यांच्या निष्कपट, निरलस मनाची भावना आहे.

'रानगूज'मधील पहिल्याच 'प्रार्थना' या कवितेत ते म्हणतात,

हे आभाळ शिरसावंद्य
न म्हणोनि कुठवर जाऊ
जो तुकडा देईल त्याचे
ऋण स्मरोनि गायन गाऊ

आपणास जीवनात जे थोडेफार यश मिळते, किंवा उच्चश्रेणीची अलौकिक अनुभूती मिळते, त्यासाठी आभाळाजवळ कृतज्ञता व्यक्त करणे आपले कर्तव्य आहे असे कवीला वाटते; कारण या धरतीच्या उत्कर्षासाठी आपणास काही हातभार लावता आला नाही याची खंत बाळगणारा आणि त्याचवेळी निदान सुजलाम् सुफलाम् धरतीला आपणांकडून कमीपणा आणणारे कृत्य घडले नाही म्हणून अभिमान बाळगणारा असा हा संवेदनशील निर्मळ मनाचा कवी आहे.

चुयेकरांची कविता एकाचवेळी गूढ-गंभीर आहे. तशी आशावादी व प्रसन्न देखील आहे. ती पारंपारिक वळणाने जाणारी, जुना घाट जपणारी आहे; तशीच ती नवविचार देणारी, वाचकाला अंतर्मुख करून क्षणभर या मानवी जीवनाच्या क्षणभंगुरतेची जाणीव करूंन देऊन त्याचे मन उन्नत करण्यास हातभार लावणारीही आहे. जे साहित्य असे मानवी मनाला उन्नत करते, ते चांगले साहित्य म्हणावयास हवे.

काही ठिकाणी चुयेकरांचे विचार मनाला थेट भिडत नाहीत. फक्त गोंधळायला होते. तसेच अनेक ठिकाणी हिंदी - मराठी शब्दांची अस्थानी संधी किंवा उपस्थिती रंगभंग करते, 'अपापरंगा' या कवितेत 'मिरमिटणे' हे हिंदीतून मराठीत आणलेले भ्रष्ट क्रियापद किंवा प्रार्थना कवितेतील 'कवन स्फुरण 'दिलखेच' अशी संस्कृत मराठी शब्दापाठोपाठ 'दिलखेच' या शब्दाची योजना ही त्याची काही उदाहरणे सांगता येतील..

नेहमीच्या प्रेमकवितेच्या किंवा समाजावर गोफण चालवणाऱ्या शेतकऱ्याची भूमिका घेऊन कविता लिहिणाऱ्या कवितांहून शरद चुयेकर यांची कविता वेगळेपणाने उठून दिसणारी आहे. त्यांची शब्दकळा मधुर आहे. कवितांमधून व्यक्त होणारे विचार उदात्त आहेत. तसेच कवितेतून स्पष्टपणे डोकावणारे कवीचे मन त्याच्या ठिकाणची विचारक्षमता आणि प्रतिभा दोन्हींची चुणूक दाखवतात. काही गूढ कवितांची पार्श्वभूमी कवीने स्वत:च प्रस्तावनेत विशद करून वाचकांना

कवितांचा रसास्वाद सुलभ केला आहे. 'प्रार्थना', 'जीवटोच', 'ह्रदयीच्या ढाली', 'श्रद्धा म्हणजे', 'नदीत नव्हते पाणी', 'आम्ही शब्दांसाठी', 'गांधारीच्या कृष्ण महाली,' 'क्षितिज' इत्यादी कविता उल्लेखनीय आहेत. चुयेकरांच्या गेय कविता अधिक आहेत. आणि मुक्तच्छंदालाही विशिष्ट लय आहे. कविश्रेष्ठ वसंत वापट यांनी 'अमृतवेल'मधील चुयेकरांच्या कवितेविषयी म्हटले आहे की, 'त्याने (कवीने) व्यवहारी शहाणपणाच्या पूर्णांकाला पाऱ्यासारख्या मनाच्या अपूर्णांकाने छेद दिला तेव्हा मोकळ्या झाल्या कोवळिकेच्या कळ्या! 'रानगूज' मधील कविताही अशाच कोवळिकेच्या कळ्या आहेत. पुढील संग्रहात त्या सुगंधासह पूर्ण उमलाव्यात; ही इच्छा! आपण प्रतिक्षा करू या.

*'रानगूज': शरद चुयेकर, ६८, सी-६ सूर्यलोक नगरी हडपसर रोड, पुणे ४११ ०१३.*
*पृष्ठसंख्या ६९, किंमत रु. ४५/-*

□

*प्रकाशक : कॉन्टिनेन्टल प्रकाशन, विजयानगर, पुणे ४११ ०३०.*

□

## व्यक्तिगत सुखदु:खाच्या पलीकडे!

'गाथा' हा सुहासिनी इर्लेकर यांचा तिसरा काव्यसंग्रह. त्या समीक्षक आणि कवयित्री या दोन्ही नात्यांनी मराठी वाचकांना सुपरिचित आहेत. 'अक्षर'मधील त्यांच्या कवितेपेक्षा 'गाथा' मधील त्यांच्या कवितांचे स्वरूप सर्वस्वी भिन्न आहे. कवयित्री स्वत:च्या भावकोषातून बाहेर पडून समाजसन्मुख झाल्या असून जी समाजचित्रे त्यांनी कवितांमध्ये शब्दांकित केली आहेत, ती विविधता, जिवंतपणा आणि शब्दकला या तिन्हींच्या अनुषंगाने विचार करता उल्लेखनीय आहेत. ही कविता स्त्रीवादी नाही, बायकी नाही तरीही आजच्या ग्रामीण आणि निमशहरी स्त्रीची कुचंबणा आणि शोषण नेमक्या शब्दात टिपणारी आहे; तशीच सामाजिक विषमता, राजकीय भ्रष्टाचार, स्वार्थांधता, स्वातंत्र्योत्तर काळात राजकीय पुढाऱ्यांमध्ये आलेला कोडगेपणा इत्यादी गोष्टींवर उपहासपूर्ण टीका-टीप्पणी करणारी आहेत. कवयित्री उघड्या डोळ्याने जगताना अनेक अप्रिय, अन्याय्य गोष्टी पाहतात, पण समाजातून त्या हद्दपार करणे त्यांच्या हाती नाही, मात्र त्यावर उपहासपूर्ण भाष्य करून वाचकांच्या नजरेपुढे ठेवाव्या, आपल्या आजुबाजूच्या लोकांना जागरूक करून त्यांना विचार सन्मुख करावे अशा मर्यादित हेतूने या कविता लिहिलेल्या आहेत. म्हणूनच 'बाईचा जन्म' या कवितेत डॉ. सुहासिनी इर्लेकर म्हणतात,

'जात्याला जुंपतील
जुंपून घे
अंगाला डागतील
डागून घे'

कारण बाईच्या जन्माला आली आहेस तर हे सारे सोसणे अटळ आहे, असे त्यांना वाटते. समाजाची आजची स्थिती वर्णन करताना कवयित्री 'महाभारत' या कवितेत म्हणतात,

'रस्त्यारस्त्यावर द्रौपदी वस्त्रहरणाचे मोफत प्रयोग
मंदिरेच झालीत वधस्थळे नि यात्रास्थळे कत्तलखाने
आताशा नाहीच होत शोकाचा श्लोक वा वेदनेचा वेद
अलीकडे संजयही करू लागलाय वृत्तनिवेदन पोटार्थी
अवघा राष्ट्रपुरुषच झालाय धृतराष्ट्र जन्मान्ध.'

हे दाहक सामाजिक सत्य तितक्याच दाहक आणि परखड शब्दांत सांगणाऱ्या कवयित्री अनेक समाजचित्रे कवितेत एकापुढे एक चितारीत जातात, मात्र 'कागदी नावा' या कवितेत म्हटल्याप्रमाणे या समाजातील दु:खांचे निराकरण करण्याचा उपाय त्यांच्याजवळ नाही. त्या पावसाशिवाय आलेल्या या प्रलयंकारी महापुरात कवितांच्या नावा सोडण्याखेरीज काही करण्यास असमर्थ आहेत. आणि हाच विचार संपूर्ण काव्यसंग्रह वाचल्यानंतरही वाचकांच्या मनात येतो. कारण काव्यामधील समाजचित्रे किंवा सामाजिक दु:खे सहानुभूतीने वर्णिलेली असली तरी त्यात स्वानुभूतीच्या ओलावा नाही. स्वत: भोगलेल्या दु:खाची खोली नाही, अर्थात त्यामुळे कविता उणी ठरत नाही, कवयित्रीचा प्रयत्न स्तुत्यच आहे.

*'गाथा' : डॉ. सुहासिनी इर्लेकर, २७५ अक्षर, विद्यानगर (प) बीड - ४३१ १२२.*
*पृष्ठसंख्या ७६, किंमत रु. ७५ /-*

□

*प्रकाशक : साधना प्रकाशन, ४३१ शनिवार पेठ, पुणे ४११ ०३०.*

□

## सामाजिक शोषण !

भगवान ठग हे नवकाव्यातील एक प्रस्थापित नाव. त्यांचा 'वाळवीची कुळे' हा सहावा काव्यसंग्रह. ऐतिहासिक दस्तऐवज किंवा महत्त्वपूर्ण अभिलेख कुरतडून मातीमोल करणारी वाळवी शोषणं करणाऱ्या व्यवस्थेला का लागत नाही? मनात उद्‌भवलेल्या या महत्त्वाच्या प्रश्नाचे उत्तर शोधण्यासाठी या काव्यसंग्रहातील सर्वच कवितांची निर्मिती झाली आहे असे वाटते. 'जीवनाकडे नकारात्मक दृष्टीने पाहणाऱ्या कवीच्या दृष्टीला या जगात सर्वत्र निराशाजनक दृश्य दिसतात.

'माथेफिरूंनी अवघ्या पृथ्वीला वेढा घातलाय
आणि ती अर्धमेली होऊन
भक्षण करतेच नि:सत्व गवत'

असाच कवीचा एकूण सूर असून कवीला प्रत्येक क्षेत्रात आपल्या याच विचाराचे प्रत्यंतर येत आहे.

'या युगावर कोणते गंडातर येत आहे.'

रक्ताचे घोट घेण्यातच आसूरी हर्षाचे परिमळ दरवळत राहतात असे त्यांना वाटते. त्यांच्या दृष्टीने समाजाचे शोषण होत आहे. ईश्वरही हे शोषण थांबविण्यास असमर्थ आहे. अवघी

सत्तास्थानं किडून गेली आहेत. त्यामुळे 'जीभेची माती झालीय' आणि अस्तित्त्वाचा धूर या जगात त्यांना एकही आशास्थान दिसत नाही. उलट ईश्वराने दगडांच्या मायावी मूर्ती करण्यात माणसाला गुंतवून ठेवले आहे. याचा त्यांना राग आहे. कारण त्यांच्या मते विश्वाच्या विटेवर उभा असलेला लंगडा पांडुरंग आता निष्प्रभ झाला आहे.

एकूण भगवान ठग याची कविता समाज व्यवस्थेला लागलेली वाळवी शोधण्यात रमलेली आहे आणि त्यांना सर्वत्र वाळवीच दिसते आहे. या जगात शोषण आहे. तसेच नवजीवन आहे. नवनिर्मितीही आहे पण कवीने त्याची दखल घेतलेली नाही. वाळवीचा नायनाट व्हावा ही तळमळ प्रशंसनीय खरीच पण -

'कवितेची वाघनखं बोथट' कथेचा गर्भपात आणि कादंबरीला आलं आहे वैधव्य' असे म्हणून अश्रू ढाळणे कितपत योग्य आहे? प्रत्येक मावळत्या दिवसामागून अंधार येतो हे खरं, पण चांदण्याच्या रूपाने प्रकाशाची फुलं या अंधारातच फुलतात ना? काही वीभत्स शब्दांचा मोह कवीने टाळावा. त्यामुळे अर्थ प्रभावी होण्यापेक्षा अर्थसौंदर्य गभावले जाते असे वाटते. असे असले तरी विद्रोही कवितांचा एक उल्लेखनीय व वाचनीय काव्यसंग्रह म्हणून ठग यांच्या कवितांच्या उल्लेख करावा लागेल.

'वाळवीची कुळे' : भगवान ठग, पृष्ठे ७६, किंमत ६५ रुपये

□

प्रकाशक : सौ पार्वती ठग, तुका म्हणे प्रकाशन
'राजश्री', शाहूनगर, चैतन्यवाडी बुलढाणा ४४३ ००१.

□

## संबद्धतेचा विविधांगी शोध !

अंजली कुलकर्णी यांचा 'मी एक स्त्री जातीय अस्वस्थ आत्मा' हा काव्यसंग्रह अनेकांना अस्वस्थ करून गेला. अलीकडेच कविता लिहू लागलेल्या या कवयित्रीच्या विचारांची झेप आणि दिशा या संग्रहाने वाचकांना दाखवून दिली. 'संबद्ध' हे त्यांचे काव्यप्रांतातील दुसरे समर्थ पाऊल. एकविसाव्या शतकाच्या उंबरठ्यावर उभ्या असलेल्या एका सुशिक्षित, सुजाण आणि संवेदनाशील मनाचे स्पंदन या संग्रहातील बहुतेक कवितांमधून जाणवते; संग्रहात प्रेमकवितांची संख्या बरीच आहे. पण हे प्रेम तारुण्यसुलभ. शारीरिक नाही. ते प्रौढ, समंजस आहे. प्रेमभावनेचा विचार कवितेत संपूर्ण जीवनाच्या संदर्भात येतो. त्यावर अंतर्मुख होऊन विचार करताना कवयित्रीला प्रेमाच्या या सोनेरी क्षणांचे अप्रुप वाटते. कारण संसार, नोकरी, वाढते वय इत्यादी अप्रिय गोष्टींनी वेढलेल्या त्यांना अवेळी हाती आलेल्या ह्या तुटपुंज्या सोनेरी क्षणांची अपूर्वाई वाटते.

पण 'प्रेम' हे काही जीवन सर्वस्व नव्हे. व्यक्ती अनेक धाग्यांनी आपल्या सभोवतालच्या विश्वाशी संबद्ध असते. यातूनच व्यक्तीच्या वाट्याला जसे सोनेरी क्षण येतात, तसे साखळदंडही येतात. मग जीवन बेचव आणि निरर्थक वाटू लागते. नात्यांमधील ठिसूळपणा लक्षात येतो. जीवन असह्य होऊन जाते.



अनुक्रमणिका






'थोडे थोडे विष पचवत राहिले रोज
की मृत्यूचे भय नाही उरत
उलट टणक बनवते ते
शरीरमनाला, अवघे अस्तित्त्व सरावते
कुठल्याही जहरील्या घोटाला
असा रोज विषाचा प्याला समोर येतो.'

त्यामुळे कवयित्री म्हणतात,

'मी मात्र भिंतीला गेलेल्या वेड्यावाकड्या
तड्यांसारखी दुभंगलेली
किंवा कोसळलेल्या विजेमुळे अर्धवट जळलेल्या
झाडाच्या बुंध्यासारखी
दोन हातांवरच पाणी सडत ठेवलेली
खानोलकरांची विहीर'

अर्थात ही उद्विग्नता अनेकदा डोके वर काढत असली तरी अखेरीच्या कवितेतील सर्वांमधून अलग होऊन, अलिप्तपणाने नव्याने जीवनाला सामोरी जाऊ इच्छिणारी दुर्दम्य आशावादी वृत्ती म्हणते,

'मी नव्याने जन्मते आहे पुन्हा
या तरी जगण्यास माझ्या अर्थ यावे'

प्रौढ आणि संयमित शब्दयोजना, मुक्तछंदातही विशिष्ट लय. नावीन्यपूर्ण प्रतिमा आणि अनुभवांची प्रामाणिक अभिव्यक्ती या काही वैशिष्ट्यांमुळे कवयित्रींची कविता भावते आणि दीर्घकाळ मन व्यापून राहते. त्यांच्या पुढील काव्य प्रवासास शुभेच्छा !

*'संबद्ध' : अंजली कुलकर्णी,*
*बी-२०, झाला कॉम्प्लेक्स, गुलटेकडी, मार्केटयार्ड, पुणे ४११ ०३७.*
*पृष्ठसंख्या ८४, किंमत ७० रुपये*

□

*प्रकाशक : ग्रंथाली, इ.ए.सोसायटीची म.फुले कन्याशाळा,*
*बाबरेकर मार्ग, दादर, मुंबई ४०० ०२८.*

□

## भावस्पर्शी मनाचे काव्यकूजन !

कोल्हापूरचे ज्ञानेश्वर कुलकर्णी यांचे नाव कुमार साहित्यासाठी आपण ऐकून आहोत. त्यांचा गुंजन हा पहिलाच काव्यसंग्रह. हौस म्हणून केलेले लेखन असे, एकूण कवितांचे स्वरूप आहे. त्यामध्ये सामाजिक, राजकीय, देशभक्ती, निसर्ग, प्रेम असे अनेक विषय आले आहेत.



अनुक्रमणिका

'प्राणाहूनी प्रिय मला
माझ्या कथा कविता'

असे कवी म्हणतात. पण कवीला अथवा लेखकाला काळाबरोबर चालणे आवश्यक असते, त्यासाठी व्यासंग हवा. काव्यलेखनाचा पहिलाच प्रयत्न म्हणून स्तुत्य. या कवीजवळ चांगले विचार आहेत.

'झेपावलो अंतराळात तरीही
मातीच नातं विसरू नये'

ही त्यांची भावना आहे. निसर्ग कवितांची संख्या संग्रहात अधिक आहे, त्यातून त्यांचे निसर्गप्रेम दिसून येते. याखेरीज सोबत 'का? आणि का?', 'दिले वचन ऋतुंना', 'माझ्या वाटेवर' अशा काही रचना सरस आहेत. त्यांनी प्रतिभेला व्यासंगाची जोड दिली तर यापेक्षा अधिक चांगल्या काव्यनिर्मितीची खात्री रसिकांना बाळगता येईल.

'गुंजन' : ज्ञानेश्वर कुलकर्णी, २८७५ ए वॉर्ड, वांगी बोळ, कोल्हापूर - ४१६ ०१२.
पृष्ठे ४८, किंमत रु. १६/-

❑

प्रकाशक : शिवश्री ज्ञानदीप प्रकाशन, कोल्हापूर.

❑

सौ. स्नेहसुधा कुलकर्णी, 'पालवी' सुपार्श्वनाथ सोसायटी, मार्केटयार्ड, पुणे ४११ ०३७.

---

**साभार पोच**

- ❑ **लोकराजा शाहू छत्रपती :** डॉ. रमेश जाधव, सुरेश एजन्सी, पुणे. पृष्ठे ३७६
- ❑ **श्री. अरविंद क्रांतिकारक व योगी :** प्रभाकर नूलकर, कर्मयोगी प्रकाशन, पृष्ठे २२९
- ❑ **बदलती क्षितिजे :** सुरेन्द्र कांवळी, अनुभव प्रकाशन, पुणे. पृष्ठे ३८०
- ❑ **राजनीति :** प्रकाश बाळ, श्रीविद्या प्रकाशन, पुणे. पृष्ठे २४०
- ❑ **साहित्य सहवास :** गिरीजा कीर, दिलीपराज प्रकाशन, पुणे. पृष्ठे २६२
- ❑ **ना राधा ना रुक्मिणी :** हेमा जावडेकर, नॅशनल बुक ट्रस्ट, दिवा, पृष्ठे १०४

**मौज प्रकाशन, मुंबई, यांची प्रकाशने**

- ❑ **सत्तांतर :** गोविंद तळवलकर, पृष्ठे २३४
- ❑ **कबीरा :** मंगेश पाडगावकर, पृष्ठे १४०
- ❑ **शारदासंगीत :** प्रकाश नारायण संत, पृष्ठे १६२
- ❑ **मुखवट्याचा दिमाख :** सहदेव मखमले, निहारा प्रकाशन, पृष्ठे ६४
- ❑ **संस्कृति व साबण :** यमनाजी आढाव, विदर्भ लेखकसंघ प्रकाशन, नागपूर. पृष्ठे ६४

# महर्षी विठ्ठल रामजी शिंदे यांचे ललित स्वरूपाचे लेखन : सर्वांगीण अभ्यास

डॉ.कु. विजया महादेव वाडकर

महर्षी विठ्ठल रामजी शिंदे (इ.स. १८७३-१९४४) हे एक अष्टपैलू प्रगल्भ व्यक्तिमत्त्व होते. त्यांच्या थोर सामाजिक कार्याप्रमाणेच त्यांनी केलेले ललित स्वरूपाचे लेखनही सरस उतरले आहे.त्यांच्या या साहित्यिक पैलूंवर नव्यानेच प्रकाश टाकणारा विद्यापीठीय पातळीवरील संशोधन प्रबंध शिवाजी विद्यापीठाने मान्य केला व प्रस्तुत लेखिकेस मराठी विषयातील डॉक्टरेट ही पदवी प्रदान केली. सदरच्या प्रबंध लेखनामागील भूमिका व प्रबंधाची वैशिष्ट्ये यांचे संक्षिप्त विवेचन खालीलप्रमाणे करीत आहे.

महर्षी विठ्ठल रामजी शिंदे हे अस्पृश्यतानिवारणाचा अखिल भारतीय पातळीवर संस्थात्मक प्रयत्न करणारे पहिले थोर तत्त्वचिंतक म्हणून प्रसिद्ध आहेत. आयुष्यभर कार्यव्यापृत असूनही त्यांनी वैचारिक स्वरूपाचे तसेच ज्याला ललित लेखन म्हणता येईल असे लेखनही बऱ्याच प्रमाणात केलेले आहे. त्यांच्या वैचारिक स्वरूपाच्या लेखनाचे विवेचन काही एका प्रमाणात झालेले आहे. मात्र त्यांच्या ललित स्वरूपाच्या लेखनाच्या वैशिष्ट्यांचा, त्यातील वाङ्मयीन गुणवत्तेचा विचार अत्यल्प प्रमाणातच झालेला दिसून येतो. म. शिंदे यांच्या ललित स्वरूपाच्या लेखनाचा सांगोपांग विचार करावा हा प्रस्तुत प्रबंधाचा उद्देश आहे.

शिंदे यांनी लिहिलेल्या ललित स्वरूपाच्या साहित्यामध्ये 'माझ्या आठवणी व अनुभव' हे त्यांचे विस्तृत आत्मचरित्रपर लेखन, त्यांनी पुणे, फर्ग्युसन, इंग्लंड व येरवडा येथे लिहिलेली रोजनिशी, युरोपमधील व भारतातील प्रवासावर आधारलेले प्रवासवर्णनपर व स्थलवर्णनपर लेख, ब्राह्मसमाज शतसांवत्सरिनिमित्त त्यांनी केलेल्या सफरीचे वर्णन व काही व्यक्तिविषयक लेखन एवढ्या सामग्रीचा समावेश होतो. सदरच्या प्रबंधाची मांडणी सहा प्रकरणांमधून केलेली आहे.

प्रबंधाच्या प्रस्तुत अभ्यासामध्ये प्रारंभी म. शिंदे यांचे जीवन, त्यांचे कार्य हे त्यांनी केलेल्या लेखनाचा आधार ध्यानात घेऊन त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचे आकलन मांडण्याचा प्रयत्न केलेला आहे. प्रस्तुत पार्श्वभूमीवर पुढील अभ्यासातून त्यांच्या ललित साहित्याचा, त्यांचे आत्मचरित्रपर लेखन, त्यांची रोजनिशी, प्रवासवर्णनपर लेख यांचा क्रमश: विचार करून त्यांमधून त्यांचे व्यक्तिमत्त्व कसे अविष्कृत होते, त्यांच्या मनाची ठेवण, त्यांची वैचारिकता व संवेदनशीलता, त्यांचा जीवनविषयक दृष्टिकोन कसा अविष्कृत होते व त्यामुळे त्यांच्या लेखनाला आशयाची समृद्धता व वाङ्मयीन गुणवत्ता कशी प्राप्त होते याचे विवरण केले आहे. त्याचप्रमाणे म. शिंदे यांच्या गद्यशैलीचे कोणते विशेष दिसून येतात व त्यामुळे त्यांच्या लेखनाला अभिव्यक्तीचे










**अल्प परिचय**

डॉ.कु.विजया महादेव वाडकर यांनी विद्यापीठ अनुदान मंडळाने डॉ.गो.मा.पवार यांना मंजूर केलेल्या महर्षी विठ्ठल रामजी शिंदे : व्यक्ती आणि कार्य, या बृहत संशोधन प्रकल्पामध्ये संशोधन सहाय्यक म्हणून काम केले आहे. त्यांनी न्यू कॉलेज, कोल्हापूर येथून बी.ए. आणि शिवाजी विद्यापीठात एम.ए.केले असून उच्च श्रेणी मिळविली आहे. त्यांच्या महर्षी विठ्ठल रामजी शिंदे यांचे ललित स्वरूपाचे लेखन : सर्वांगीण अभ्यास या विषयावरील डॉ.गो.मा. पवार यांचे मार्गदर्शन लाभलेल्या संशोधन प्रबंधास (शिवाजी विद्यापीठ,कोल्हापूर) नुकतीच मान्यता मिळून त्यांना पीएच. डी.पदवी मिळाली आहे.



सौंदर्य कसे प्राप्त होते याचे विवेचन प्रस्तुत अभ्यासाच्या अखेरीस केले आहे.

वि.रा. शिंदे यांचे संपूर्ण लेखन वाचल्यानंतर मला प्राधान्याने जाणवले की, त्यांच्या लेखनामध्ये जे वाङ्मयीन सौंदर्य निर्माण होते ते मुख्यत: त्यांच्या प्रगल्भ व्यक्तिमत्त्वाचा अविष्कार आणि उदार मनोवृत्तीचा प्रत्यय देण्याचे त्यात सामर्थ्य असल्यामुळे विठ्ठल रामजी शिंदे यांनी केलेल्या ललित स्वरूपाच्या लेखनामध्ये त्यांची सत्यनिष्ठा, अध्यात्मिकता, चिंतनशीलता, मानवतावादी जाणीव, निसर्गाविषयी प्रेम व प्रसन्न विनोदवृत्ती हे व्यक्तिमत्त्वाचे विशेष सकृतदर्शनी जाणवतात. त्यांच्या लेखनाला वाङ्मयीन गुणवत्ता लाभण्याचे दुसरे कारण म्हणजे, त्यांचा भाषेचा वैशिष्ट्यपूर्ण उपयोग.

प्रबंधाच्या पहिल्या प्रकरणामध्ये विठ्ठल रामजी शिंदे यांचे बालपण, त्यांच्या कुटुंबातील व त्यांच्या सान्निध्यात आलेल्या व्यक्ती, त्यांच्या घरातील अध्यात्मिक वातावरण यांचा ऊहापोह केलेला आहे. शिंदे यांच्या मनाच्या घडणीच्या काळातील झालेले अन्य संस्कार यांचाही विचार यामध्ये केलेला आहे.

प्रबंधाच्या दुसऱ्या प्रकरणामध्ये विठ्ठल रामजी शिंदे यांनी लिहिलेल्या ललित स्वरूपाच्या साहित्य निर्मितीत त्यांच्या तीन रोजनिशींचा विचार केलेला आहे. त्या अशा —

१. इ.स. १८९८ मध्ये ते पुण्याला फर्ग्युसन कॉलेजात शिकत असताना,

२. इ.स. १९०१ ते १९०३ मध्ये अभ्यास करण्यासाठी ऑक्सफर्डला गेले असताना,

३. कायदेभंग केल्यामुळे १९३० मध्ये येरवड्याच्या तुरुंगवासात असताना.

प्रबंधाच्या तिसऱ्या प्रकरणामध्ये वि.रा. शिंदे यांच्या आत्मपर लेखनाचा दुसरा अविष्कार म्हणजे 'माझ्या आठवणी व अनुभव' या आत्मचरित्रपर ग्रंथाचा विचार केलेला आहे. या आत्मचरित्रामध्ये संपूर्ण जीवनाचा आलेख, बालपण, शिक्षण, अस्पृश्यांचे कार्य, डिप्रेस्ड क्लासेस मिशन, धर्मकार्य, शेतकऱ्यासंबंधी कार्य, राजकारण, ग्रामीण परिसरातील कार्य, वाई



अनुक्रमणिका

ब्राह्मसमाज इ. चित्रणाने त्यांचे आयुष्य आपल्या डोळ्यांसमोर उभे राहते. या लेखनातून प्रगल्भपणा, समतोल वृत्ती, मानवतावादी जाणीव, विनोदवृत्ती या व्यक्तिमत्त्वाच्या विशेषांचा अविष्कार प्रत्ययाला येतो.

या आत्मचरित्रामध्ये कुठेही आत्मसमर्थन नाही, आत्मस्तुती नाही, की इतरांना दूषणे दिल्याची उदाहरणे अपवादानेही दिसत नाहीत. त्यांच्या लेखनातून मनाच्या प्रसन्न वृत्ती, धार्मिक वृत्ती, ऐतिहासिक दृष्टिकोन, चिंतनशीलता इ. त्यांच्या व्यक्तिमत्त्वाच्या अनेकविध पैलूंचा प्रत्यय येतो.

प्रबंधाच्या पाचव्या प्रकरणामध्ये वि.रा. शिंदे यांनी काही ऐतिहासिक विभूतीबद्दल तसेच काही समकालीन थोर कर्तृत्ववान पुरुषांबद्दल जे लेखन केले आहे त्याचा परामर्ष घेतला आहे. वि.रा. शिंदे यांनी थोर प्रसिद्ध व्यक्तींबद्दल जसे लेखन केले आहे, तसेच काही प्रसिद्धी पराङ्मुख राहून निष्ठावंतपणे कार्य करणाऱ्या व्यक्तींबद्दलही लेखन केले आहे.

त्यांच्या व्यक्तिविषयक लेखनात छत्रपती शिवाजी महाराज, राजा राममोहन रॉय, महात्मा जोतीबा फुले, केशवचंद्र सेन यासारख्या मौलिक कार्य केलेल्या पूर्वीच्या काळी होऊन गेलेल्या या ऐतिहासिक विभूतीविषयक लेखन आहे.

त्याचप्रमाणे सार्वजनिक जीवनामध्ये वि.रा. शिंदे यांच्याशी साक्षात् थोडाफार संबंध आलेला आहे अशा श्रीमंत सयाजीराव गायकवाड, लोकमान्य बाळ गंगाधर टिळक, श्रीमंत शाहू छत्रपती, महात्मा गांधी यासारख्या राजकीय व सामाजिक जीवनामध्ये महत्त्वाची कामगिरी केलेल्या थोर पुरुषांबद्दलही त्यांनी लेखन केलेले आहे.

द्वा.गो. वैद्य यांच्यासारख्या प्रार्थनासमाजाच्या थोर कार्यकर्त्याबद्दलही त्यांनी लेखन केलेले आहे. हे लेखन 'शिंदे लेखसंग्रह' व 'धर्म जीवन व तत्त्वज्ञान' या दोन पुस्तकांमध्ये समाविष्ट आहे. त्यांच्या या अशा व्यक्तिविषयक लेखनाचा प्रस्तुत प्रकरणामध्ये विचार केलेला आहे.

या सर्वच लेखांमधील व्यक्तिचित्रांतून संबंधित व्यक्तीबद्दल वास्तवचित्र जसे उमटते तसेच वि.रा. शिंदे यांच्या स्वत:च्या मनाची आध्यात्मिक व नैतिक बैठक प्रतीत होते व त्यांच्या मनाची सर्वंकष व्यापकताही त्यामधून दिसून येते. शिंदे यांची मनोवृत्ती उदारमतवादी व विश्वकुटुंबाच्या ध्यासाने प्रेरित अशी मानवतावादी आहे. या लेखनामधून त्यांचे ऐतिहासिक व सामाजिक भान, सांस्कृतिक जीवनाची जाणीव व्यक्त होताना दिसते. वि.रा. शिंदे यांनी केलेल्या व्यक्तीविषयक लेखनातून त्यांचे त्या त्या व्यक्तीविषयीचे स्वतंत्रपणे केलेले आकलन पूर्वग्रहनिरपेक्ष व वस्तुनिष्ठ प्रकारचे आहे हे स्पष्ट होते.

म. शिंदे यांचा मन:पिंड आध्यात्मिक असल्यामुळे व्यक्तींचे आकलन ते याप्रकारे करू शकले आहेत. शिंदे या प्रकारच्या व्यक्तीविषयक लेखनातून मानवी व्यक्तीबाबत व जीवनाबद्दलचे उन्नत चित्र आपल्या प्रत्ययाला आणून देतात. ह्या गुणविशेषांमुळे म. शिंदे यांच्या लेखनाला वाङ्मयीन गुणवत्ता प्राप्त होते, अशी मांडणी केली आहे.

प्रबंधाच्या सहाव्या प्रकरणामध्ये म. शिंदे यांच्या लेखनशैलीचा आणि भाषेचा विचार

**महर्षी विठ्ठल रामजी शिंदे यांच्या ललित स्वरूपाच्या लेखनाची सूची**

१. केसकर बी. बी. संपा., विठ्ठल रामजी शिंदे यांचे लेख, व्याख्याने व उपदेश. दामोदर सावळाराम आणि मंडळी, मुंबई, १९१२. (प्रवासवर्णनपर व स्थलवर्णनपर लेख)

२. पवार गो.मा. संपा. 'महर्षी विठ्ठल रामजी शिंदे यांची रोजनिशी', मराठवाडा साहित्य परिषद, औरंगाबाद, १९७९.

३. मंगुडकर मा.प. संपा. 'शिंदे लेखसंग्रह' ठोकळ प्रकाशन, पुणे, १९६३. (व्यक्तिविषयक लेख)

४. शिंदे विठ्ठल रामजी, 'माझ्या आठवणी व अनुभव', लेखन वाचन भांडार, पुणे, १९५८

५. शिंदे विठ्ठल रामजी, 'धर्म जीवन व तत्त्वज्ञान' संपा., मा. प. मंगुडकर, ए.के. घोरपडे, गो.मा.पवार इ. समाज कल्याण विभाग, महाराष्ट्र शासन, १९७९. (व्यक्तिविषयक लेख)

६. शिंदे विठ्ठल रामजी, 'वि.रा. शिंदे यांची ब्राह्मसमाज शतसांवत्सरिक सफर. (हस्तलिखित)

केलेला आहे. त्यांच्या ललित स्वरूपाच्या लेखनाला जी वाङ्मयीन गुणवत्ता प्राप्त होते त्याचे एक कारण म्हणजे, शिंदे यांच्या प्रगल्भ व्यक्तिमत्त्वाचा त्यामधून होणारा अविष्कार आणि दुसरे कारण हे की ते भाषेचा अत्यंत समुचित उपयोग करून आपले लेखन वाचकांच्या दृष्टीने प्रत्ययकारी बनवितात. शिंदे यांच्या सर्वच प्रकारच्या ललित लेखनाला त्यांच्या लेखनशैलीमुळे व वैशिष्ट्यपूर्ण भाषा वापरामुळे वाङ्मयीन गुणवत्ता प्राप्त होताना दिसते.

अलंकारांचाही वापर ते यथायोग्यपणे करीत असले तरी साधेपणा हा त्यांच्या शैलीचा खास विशेष आहे; तसेच अस्सल मराठीपणा हे तिचे वैशिष्ट्य आहे. मनातील अभिप्राय प्रकट करण्यासाठी मराठी वळणाला योग्य असे संस्कृत शब्दही ते समर्पकपणे वापरतात. ही त्यांची हातोटी खास त्यांची असल्याचे जाणवते. अनुभूतीच्या अभिव्यक्तीला जर समर्थ व समर्पक शब्दांची जोड मिळाली नाही तर आशय व्यक्त होणे दुरापास्त होते; निवेदन दुर्बोध होते. वि.रा. शिंदे यांच्या लेखनात अशी दुर्बोधता कुठेही आढळत नाही.

उपरिनिर्दिष्ट लेखनवैशिष्ट्यांवरून वि.रा. शिंदे यांचे ललित स्वरूपाचे साहित्य वाचताना त्यांच्या वेधक लेखनशैलीचे दर्शन घडते व सहजसुंदर मराठी वळणाच्या शब्दांमधून आशयघन व व्यापक जीवनदृष्टी अविष्कृत करण्याचे सामर्थ्यही ठिकठिकाणी प्रत्ययास येते.

विठ्ठल रामजी शिंदे हे थोर समाजसुधारक असूनही त्यांचे संशोधनकार्य व लेखन, व्यापक धर्मकार्य हेही उत्तम दर्जाचे आहे. त्यांच्या सर्वच लेखनामधून प्रगल्भ व्यक्तिमत्त्वाचा अविष्कार होतो. त्यांच्या वैशिष्ट्यपूर्ण भाषेतून लालित्याचा प्रत्यय येतो. त्यामुळे ते एक अव्वल दर्जाचे ललित लेखक आहेत असा निष्कर्ष प्रस्तुत प्रबंधामध्ये काढलेला आहे.

□

डॉ. कु. विनया महादेव वाडकर
'अक्षर' ए/१४६, फुलेवाडी, कोल्हापूर ४१६ ०१०.



अनुक्रमणिका

# १९९७ दिवाळी अंक - उल्लेखनीय

नन्दा सुर्वे

म. सा. पत्रिकेच्या एप्रिल, मे, जून १९९७ च्या अंक क्र. २८१ मध्ये महाराष्ट्राच्या कानाकोपऱ्यात परिश्रमपूर्वक संपादित - प्रकाशित होणाऱ्या दिवाळी अंकातील ललितेत्तर विविध, वैविध्यपूर्ण, वैचारिक लेखांची सूची प्रकाशित केली होती. वाचकांना हा उपक्रम खूपच भावला. अनेकांची त्यासंबंधी पत्रे आली. १९९८ च्या दिवाळी अंकातून प्रसिद्ध झालेल्या लेखांची, परिसंवादांची सूची सोवत दिली आहे. सर्व संकलन मागील वर्षा प्रमाणेच केले आहे. ते वाचकांना उपयुक्त ठरावे असा विश्वास वाटतो.

सर्वच दिवाळी अंक आमच्या हाती लागतात असे नाही. वरील सूचीशिवाय अन्य काही विचारप्रवर्तक लेखन प्रसिद्ध झाले असल्यास आणि ते आपल्या वाचनात आले असल्यास वाचकांनी अवश्य कळवावे, त्यांची नोंद पुढील अंकात घेणे शक्य होईल.

या संकलनाबाबत वाचकांच्या प्रतिक्रिया अपेक्षित आहेत. अंकाचे नाव, संपादकाचे नाव, लेखाचे नाव व लेखक असा मागील वर्षाप्रमाणेच क्रम ठेवला आहे.

**अपूर्व** : ह.मो. मराठे
तीच कथा आज परत लिहिली तर — *योगिनी जोगळेकर, वसुंधरा पटवर्धन, स्नेहलता दसनूरकर, ज्योत्स्ना देवधर, शैलजा राजे.*
'आनंद संगीत' — *संगीतकार आनंद मोडक* यांची मुलाखत — *स्वाती कर्वे*
सेस्ना १७२ (विक्रमी विमान प्रवास) — *सतीश सोमण*
'डायलिसीसवर' — *ज्ञानेश्वर पारगावकर*

**अक्षरदीप :** कुसुम धुमाळ, विकास देशपांडे
फाळणी टाळता आली असती काय? (परिसंवाद) — *ग.प्र.प्रधान, राम बापट*
स्वातंत्र्योत्तर काळातील दलित समस्या — *रा.ग.जाधव*
नव्या वळणावर समाजवादी विचार — *प्रा.विकास देशपांडे*
चित्रपट बंद केल्यानंतरच नाटक करणार — मोहन जोशी — *मुलाखत : राजेश दामले.*

**अंतर्नाद :** भानू काळे
माझी साहित्यिक प्रकृती — *डॉ.आनंद यादव.*
एक जन्मका वादा है (गुलजार) — *नंदिनी आत्मसिद्ध*
चित्रपटसृष्टीचे खरे जनक कोण? — *सूर्यकांत मांडरे.*

**अंतरंग :** पद्मा सुर्वे-भाटकर
मालवणीचा बावरा — *मधु मंगेश कर्णिक*
परममित्र जयवंत दळवी — *सुभाष भेंडे*
ऐतिहासिक ठाणे कारागृह — *हरिभाऊ शेजवळ*
न्यूनगंड — *डॉ. राजेन्द्र बर्वे*

**अभिजात (पाणी विशेषांक) :**
स्मिता पटवर्धन
चीनची हरितक्रांती आणि महाराष्ट्राची साखरक्रांती — *विलासराव साळुंखे*

हिमालयातील प्राणी — *उष:प्रभा पागे*
मानवनिर्मित दुष्काळाचा जन्म — *सुलभा ब्रह्मे*
पाणीविषयक कायदे — *ग.नी.जोगळेकर*
**अक्षर :** निखील वागळे
नॅशनल जिऑग्राफीकचं चित्रमय जग — *सुनील कर्णिक*
जी.ए. आणि मी — *रामदास भटकळ*
वसईचं पाणी — *प्रकाश बाळ*
बाळपणातला गाव — *वसंत आबाजी डहाके*
**आयुध :** डॉ हेमू अधिकारी, प्रदीप देशपांडे
स्वातंत्र्याचे अर्धशतक — काय साधले? काय राहिले?
(परिसंवाद) *शरद विचारे, मिलिंद ओतारी, अरविंद पाटील, अ.अ. महामुनी, डॉ. उमेश तेंडुलकर, सु.प्रा देवस्थळी*
पुढील शतकातील ग्राहक चळवळ — *ललिता कुलकर्णी*
**उत्तम कथा :** वैजयंती काळे
टी.व्ही स्टार पुरवणी व आरोग्य पुरवणी — *पल्लवी जोशी, सीमा केळकर, मनोरमा वागळे, उर्जिता जैन, सुमेधा भोसले.*
**उत्तरंग :** सविता भावे
मन:स्वास्थ्य आणि शरीरस्वास्थ्य या विषयावर तज्ज्ञांचे लेख
गाणे तीन पिढ्यांचे (शेंडे कुटुंब) — *जयश्री रानडे*
जिंदादिल शायर भाऊसाहेब पाटणकर — *मधुकर टिल्लू*
निद्रा : वैरीण की देवता — *डॉ.ह.वि.सरदेसाई*
'निवारा'चे राजाभाऊ माटे — *राजीव नातू*
**उद्याचा उष:काल :** पांडुरंग रानडे
गड्या अपुला देश बरा — *चंद्रसेन गायकवाड (दुबई)*
शतक महोत्सवी वि.स.खांडेकर — *विशाखा बुवा*
विक्रम गोखलेंची मुलाखत — *प्रसाद कुलकर्णी*
भारतीय जनसंघ ते भाजप — *राम कापसे*
**एकता :** उत्तम कानिटकर
पुढच्या ५० वर्षांत विक्राळ होऊ शकणाऱ्या राष्ट्रीय समस्यांचे आज बीजारोपण होत आहे? (परिसंवाद)
*डॉ.अरविंद लेले, अॅड ग.नी.जोगळेकर, डॉ. शरद कुंटे.*
संत मोरोपंत — *मा.ना.आचार्य*
म्हणे मानवाधिकार — *राहुल गोखले*
**कजरी :** स्मितांजली भुजबळ
आचार्य अत्रे बहुविध रूपे घेशी — *डॉ. रामचंद्र देखणे*
दारुबंदी एक प्रबोधन — *डॉ.पां.गो.पुरंदरे*
विनोदाचं व्याकरण — *नाना चिपळूणकर*
**कथाश्री :** अशोक लेले, प्रकाश पानसे
नाना पाटेकर : एक मुक्तछंद — *मंगला खाडिलकर*
कथा स्वातंत्र्य सैनिकांच्या — *प्रकाश कामत*
**कलाकुंज :** महेंद्र देशपांडे
काही निरोप समारंभ — *प्रा. योगेश्वर अभ्यंकर*
हरवलं माणूसपण — *प्रा.शिवाजीराव भोसले*
**कलासागर :** विलास गुजर
देवराई-निसर्गाची प्रयोगशाळा — *सुषमा कट्टी*
— कृष्णमूर्तींना अभिप्रेत सुंदर जीवन *ज.भा.झेंडे*
**गावकरी :** प्रबंध संपादक — 'दत्ता सराफ
गुरु-शिष्य : शोध एका परंपरेचा — *उस्ताद अल्लारखॉं, झाकीर हुसेन, पं. बिरजू महाराज इत्यादी शाश्वती सेन, माधवराव सातवळेकर, भास्करबुवा बखले, पं.भीमसेन जोशी, किशोरी अमोणकर, शैलेश भागवत*
वेध नात्यांचा

विवाहसंस्था — *तारा भवाळकर*
पती पत्नी — *अपर्णा वेलणकर*
**कालनिर्णय :** जयराज साळगावकर
पुस्तकात रमणारे अण्णा — *डॉ. अरुणा ढेरे*
मर्ढेकरांच्या अखेरच्या वर्षातले दोन पाऊस — *म.वा. धोंड*
महाराष्ट्र २०२० — विचारमंथन — *नानाजी देशमुख, विठ्ठलराव गाडगीळ, रा.वि.गोखले, राज ठाकरे, कुमार केतकर, सदानंद वर्दे इ.*
**किस्त्रीम :** ह.मो.मराठे
खुर्ची मुख्यमंत्र्यांची (मनोगते) *मनोहर जोशी, बाबासाहेब भोसले, सुधाकर नाईक, अे.आर्. अंतुले*
अत्र्यांच्या गोष्टी — *द.मा.मिरासदार*
आणि रंगत वाढत चाललीय — *शरद उपाध्ये, मोहन राव, विश्वास मेहेंदळे, रजत शर्मा, प्रभाकर वाडेकर, चारुहास पंडित*
**किशोर :** वसंत काळपांडे
यलोस्टोन नॅशनल पार्क — *अनिल दामले*
वन्यप्राण्यांचे क्रीडाविश्व — *सुरेशचंद्र वारघडे*
क्रिकेटचे बाळकडू — *सुहास फडके*
**केसरी :** अरविंद व्यं. गोखले
आरंभ - *गोविंद तळवलकर*
कितना बदल गया इन्सान — *लता मंगेशकर*
स्वातंत्र्योत्तर मराठी रंगभूमीचा चेहेरा किती बदलला? — *डॉ.वि.भा.देशपांडे*
सुरांची स्मरणयात्रा — *अरविंद गजेंद्रगडकर*
**कृषीवल :** एस.एम.देशमुख
राजकारण गेलं चुलित (परिसंवाद) *मनोहर जोशी, गोपीनाथ मुंडे, विठ्ठलराव गाडगीळ, छगन भुजबळ, मृणाल गोरे, प्रमोद नवलकर.*
दलित चळवळीचं भवितव्य काय? — *नामदेव ढसाळ, केशव मेश्राम, बी.व्ही.जोंधळे, वसंत चव्हाण, प्रा. अर्जुन डांगळे.*
**गंधाली :** मधुकर केशव वर्तक
राज्य चालवते कोण? सरकार की न्यायालये? — *राजाभाऊ गवांदे*
**ग्राहकहित :** सूर्यकांत पाठक
हिंसक जमावात सापडलात तर? — *सुजाता देशमुख*
रस्त्यावर अचानक हल्ला झाला तर? — *सुजाता देशमुख*
हिरव्या सृष्टीचं काळं भवितव्य — *राजीव साने*
**गृहशोभिका :** विश्वनाथ
नाती का तुटतात? — *श्याम साटम*
स्त्रियांनो स्वावलंबी व्हा — *कविता मालपेकर*
**चारचौघी :** निशिगंधा वाड
घटस्फोट (संकलन) — *संयोगिता ढमढेरे*
शिवाजी गणेशन — अभिनयाचे व्यासपीठ — *ज्योती वेंकटेश*
मुखवट्याआडची खरीखुरी माणसं — *शेखर देशमुख*
**चित्रलेखा :** माधुरी कोटक, हरकिसन मेहता
पुस्तकांचा 'नाम' महिमा — *रविप्रकाश कुलकर्णी*
'सही' शास्त्र — *सुधीर गाडगीळ*
फुलांची भाजी — *श्याम तारे*
**चंदेरी :** गौतम राजाध्यक्ष
नाटकाच्या नदीतले सांस्कृतिक पाणी — *हेमंत कर्णिक*
मराठी सिनेमा बनवतांना — *मीना कर्णिक*
सिनेमा कसा बघावा — *अशोक राणे*
**छात्र प्रबोधन :** महेंद्र सेठिया
मी असा घडलो — *नारायण सुर्वे, निळू फुले, रोहिणी भाटे, भय्यासाहेब ओंकार, चंदू बोर्डे.*
नवे ग्रह, नव्या ग्रहमाला — *डॉ. जयंत नारळीकर*
जिम्नॅस्टिक्स् — खेळाडूंची जननी — *मोरेश्वर*

*गुर्जर*
**जनसंवाद :** डॉ. सतिश पावडे
स्त्रीमुक्ती - शोध आणि बोध — *कुमुद पावडे*
बालकामगार प्रथा — स्वरूप व कारणे — *श्रीनिवास कुलकर्णी*
परिवर्तन विरुद्ध पुनरुज्जीवनवाद — *मा.गो. वैद्य*
**जनस्वास्थ :** अनिल मडके
एडस्‌विषयी बरेच काही — *डॉ.अनिल मडके*
प्राण्यांच्या प्रणयकथा — *व्ही. आर्. भागवत*
**तरुण भारत, पुणे :** भगवान दातार
मी आणि माझे गुरू — *बाबामहाराज सातारकर, ज्योत्स्ना भोळे, बाबासाहेब पुरंदरे, शरद तळवलकर, सुबल सरकार*
महिला आरक्षण — *ममता बॅनर्जी, रेणुका चौधरी, राम नाईक*
अर्चना जोगळेकरांची मुलाखत — *गिरीश करंदीकर*
'मी माझा' आणि 'मी लोकांचा' — *चंद्रशेखर गोखले*
**तरुण भारत (सोलापूर) :** विवेक घळसासी
संगीत दिग्दर्शक पु.ल.देशपांडे — *बापू वाटवे*
तुमचे आमचे सर्वांचेच भाऊ — *सुलभा खांडेकर*
**तरंग :** रमण माळवदे
लक्षात राहिलेली व्यक्ती — *नागनाथ कोतापल्ले, रमण माळवदे, प्रवीण दवणे, अनुराधा औरंगाबादकर, अरविंद ताटके, हरिश्चंद्र लचके, अशोक बेंडखळे, वामन देशपांडे, रविप्रकाश कुलकर्णी*
**तारका :** माधव चव्हाण
आचार्य अत्रे — स्त्री मुक्तीचे खंदे पुरस्कर्ते — *सुधाकर वढावकर*
बाबूराव पेंटर — *सुभाष भुरके*

**तुम्ही, आम्ही आपण सगळे :** अविनाश धर्माधिकारी
*'कर्तृत्त्वाचा शोध' या मालिकेत, साहित्य, कला, समाजकारण, प्रशासन, अर्थ-उद्योग, शास्त्र-तंत्रज्ञान, अध्यात्म या क्षेत्रातील ज्येष्ठांच्या मुलाखती सहभाग, दि.पु.चित्रे, भालचंद्र नेमाडे, ललिता पवार, ज्योत्स्ना भोळे, अमोल पालेकर, विद्या बाळ, अण्णा हजारे, दुर्गा भागवत, जयंत नारळीकर, नरेंद्र दाभोळकर*
अमेरिका — *धनंजय सस्तकर*
माझा नेता मीच — *मंगेश तेंडुलकर*
**देविका :** चारुशीला भिडे, मंजिरी देव
साद हिमशिखरांची — *ज्योती भिडे*
युरोप डायरी — *प्रतिमा खरसीकर*
गोमंतकातील देवालये — *वृंदा गावकर*
**धन्यश्री :** संध्या गायकवाड
अद्‌भुतरम्य लक्षद्वीप — *शोभा कुलकर्णी*
वंध्यत्त्व : एक शाप की उःशाप — *डॉ. वैजयंती खानविलकर*
निसर्गोपचार — *डॉ. बाबूराव झंवर*
**दीपावली :** अशोक कोठावळे
क्षेत्र एक दिग्गज दोन — *अशोक रानडे, चारुशीला दिवेकर, भा.र.साबडे, बाबू मोशाय, अशोक राणे*
**निर्मळ रानवारा :** ज्योती जोशी
स्वातंत्र्य चळवळ प्रत्येकाची — *सरिता पदकी*
तेरेखोलचा महावीर — *सुधाकर प्रभू*
क्रांतीकारक राजा पाटकर — *मंगला सामंत*
**नवी मुंबई :** शैलजा शेवडे
अशोक सराफची मुलाखत — *ललिता ताम्हणे*
**नीहार (मैत्री विशेषांक) :** स्नेहसुधा कुलकर्णी
मैत्रीविषयक लेख — *भा.द.खेर, संजीवनी*







*मराठे, राजा मंगळवेढेकर, दत्ता गोर्ले, बाळ ज. पंडित, अनुराधा पोतदार, विद्या सप्रे-चौधरी*

**पलोमी :** नीता खांडेकर

सुरक्षित प्रवासासाठी — *विलास पाटील*

कुरियर ओ कुरियर — *किरीट गोरे*

**पद्मगंधा** : अरुण जाखडे

एका जगप्रसिद्ध ग्रंथालयात (लंडन) — *डॉ. अरुणा ढेरे*

तुलुझ लोत्रेक — *जगण्यावर प्रेम करणारा चित्रकार — ज्ञानदा नाईक*

आधुनिक भारतीय रंगभूमी आणि गिरीश कर्नाड — *अपर्णा धारवाडकर*

**पालकनीती** : शुभदा जोशी, संजीवनी कुलकर्णी, नीलिमा सहस्त्रबुद्धे

दूरचित्रवाणी, मुलं आणि मोठी माणसं — *अनिल झणकर*

**वाङ्मयीन प्रतिमा** : मानवजातीच्या उपजत क्षमतेचा अविष्कार — *दिलीप पुरुषोत्तम चित्रे*

सहशिक्षण : फायदे, तोटे व मर्यादा — *डॉ. प्रसन्न दाभोळकर*

**प्रियंवदा :** उषा प्रियंवदा

थोरल्या घरची सून : स्मिता ठाकरे, गौरी कुलकर्णी

खिलाडू अत्रे — *मधुकर अत्रे*

भेटलेली मोठी माणसं — *उषा प्रियंवदा*

**पुढारी** : प्रतापसिंह जाधव

व्यंकटेश माडगूळकर यांचे दीर्घ हृदयस्पर्शी कथन

स्वतंत्र भारतातील मुस्लिम राजकारण — *वि.ग. कानिटकर*

प्रबोधन — संतसाहित्याचा आत्मा — *डॉ. यू. म. पठाण*

रशियन अणुबाँबची कथा — *निरंजन घाटे*

**पुरुष स्पंदन :** अनिल दाभाडे

दापत्यभाव — एक रसायन — *अशोक केळकर*

जीवशास्त्रीय दृष्टिकोनातून स्त्रीपुरुष समानता — *विठ्ठल प्रभू*

श्याम मनोहरांच्या कादंबरीतील स्त्री पुरुष संबंध — *हरिश्चंद्र थोरात*

स्त्रीपुरुष तुलना — काही विचार — *सदा कऱ्हाडे*

**पैलतीर :** कृष्णा गुरव

संत ज्ञानेश्वरांचा वाग्यज्ञ — *श्री. द. कुलकर्णी*

संत तुकारामांचा अभ्यास — *गीता आणि गाथा*

**मराठी ग्रंथजगत :** सुनील मेहता

लेखकांची मनोगते — *आनंद यादव, महादेव मोरे, सुधा क्षीरे, अनिल किणीकर, निरंजन घाटे* इ. वीस लेखक — लेखिकांची आपापल्या निर्मितीवर निवेदने.

**महाराष्ट्र टाइम्स** : कुमार केतकर

पन्नास वर्षांचा ठसठसणारा सल — *कुमार केतकर*

पाकिस्तानचे पुरोहित — *गोविंद तळवलकर*

फाळणी पाठोपाठ फाळणी — *जतीन्द्र कऱ्हाडकर*

भाषाबंधू उमर खय्याम — *नंदा खरे*

'मेन्श' राशीची माणसं — *अनंत मनोहर*

**मऱ्हाठी बाणा** : माधव राजवाडे

आचार्य अत्रे जन्मशताब्दी विशेषांक

*मीना देशपांडे, सदा कऱ्हाडे, प्रभाकर नेवगी* याचे लेख

स्वातंत्र्य चळवळ आणि मराठी साहित्य — *वि.शं. चौगुले*

**मानिनी :** माधव कानिटकर

उषास्वर (मुलाखत उषा मंगेशकर) नन्दा सुर्वे










लहानाच्या मोठ्या — *वीणा देव*
दरवळ सोनचाफ्याचा (वंदना गुप्तेंची मुलाखत) *मुग्धा बोबडे*
**माहेर :** पु.वि.बेहेरे, सुमन बेहेरे
कॅमेरा आपल्या घरात — मोहन वाघ, गौतम राजाध्यक्ष, श्रीकांत मलुष्टे, स्वाती कान्हेरे, विद्या कुलकर्णी — शैला मुकुंद
पडद्यामागची नायिका : प्रतिमा कुलकर्णी — *निवेदिता जोगळेकर*
स्त्रीपुरुषांच्या कर्तृत्त्व कथा — *डॉ. अरुणा ढेरे*
आठवणीत रेंगाळणारं पुस्तक — *शांता शेळके*
**मार्मिक :** बाळ ठाकरे
नंदनवन कश्मीरचा नरक बनवणारे घातपाती पत्रकार — *भाऊ तोरसेकर*
**मिळून साऱ्याजणी :** विद्या बाळ
शासनाने निर्माण केलेले अनाथ — *डॉ. मीरा बापट*
स्त्री असलेली, घडवलेली आणि दाखवलेली — *डॉ. शर्मिला रेगे*
**मेनका :** पु.वि. बेहेरे
विदेशी ग्रंथपरिचय — ली आयकोकाच्या 'टॉकिंग स्ट्रेट' या ग्रंथाचा परिचय — *डॉ. मधुकर जावडेकर*
**मौज :** श्री.पु. भागवत
माझा सगळा राग मध्यम वर्गावर आहे — *इंदुमती परीख*
पुढाऱ्यांकडे कोणतेच व्हिजन नाही — *शर्वरी गोखले*
झुंडशाहीचे फार मोठे आव्हान वृत्तपत्रांसमोर आहे — *गोविंद तळवलकर*
राजकीय पक्षांकडे नवा विचार नाही — *रमेश जोशी*
**मैत्र :** शशिकांत नार्वेकर
खांडेकर — *अत्रे विशेषांक*
*वि.वा.शिरवाडकर, मधु मंगेश कर्णिक, चंद्रकांत बांदिवडेकर, निर्मलकुमार फडकुले, माधव गडकरी, वि.भा.देशपांडे इ. चे लेख*
**रसिक :** राजेन्द्र बनहट्टी
जपानमधले दलित — *मिलिन्द बोकील*
पाखरांचा नृत्यमहोत्सव — *सुरेशचंद्र वारघडे*
सॉक्रेटीसची अखेर — *प्रा. शिरीष चिंधडे*
**रत्नभूमी :** धनंजय भिकाजी पालांडे (देशमुख)
आचार्य अत्रे आणि पुस्तके — *शिरीष पै*
पत्रकार संपादकांसाठी आचारसंहितेची गरज आहे काय?— *कुमार केतकर, माधव गडकरी, अरविंद व्यं गोखले, विजय कुवळेकर, गो.रा.खैरनार*
३३ टक्के आरक्षण महिलांचा विकास साधू शकेल का? — *जयवंतीबेन मेहता, अहिल्या रांगणेकर, शारदा साठे, नीलम गोऱ्हे.*
**रोहिणी :** वसंत काणे
(अनुवादित साहित्य विशेषांक)
अनुवादानुभव — *रवीन्द्र गुर्जर, अरुण सा·*
इंग्रजीत ज्ञानेश्वरी — *गजानन खोले*
अनुवादित नाटके — *डॉ. मधुरा कोरान्ने*
बंडखोर कलावती — ज्योती चांदेकर — *डॉ. मन्दा खांडगे.*
सी डॅक — *वर्षा बेटावदकर*
**ललित :** अशोक कोठावळे
रश तिथे तू (मर्ढेकरांवर) — *म.वा.धोंड*
इंग्रजीत लोकप्रिय झालेल्या भारतीय लेखकांच्या गुणवत्तेचा प्रश्न — *म.द.हातकणंगलेकर*
शेक्सपीअर — *कसाही विचार केला तरी* मोठाच — *शंकर सारडा*
**लोकमत :** जवाहरलाल दर्डा, विजय दर्डा
लोकशाहीची जडणघडण (चर्चा) — *दादा धर्माधिकारी, डॉ.नि.र.वऱ्हाडपांडे, हृषिकेश*









*कांबळे, डॉ. जगन्नाथ नाईकवाडे.*
मी व माझे लेखन — *महावीर जोंधळे, लक्ष्मण लोंढे, आशा बगे, सानिया, रेखा बैजल, अरुणा ढेरे.*
शहरे : बदलते चेहेरे — *रवीन्द्र पिंगे (मुंबई) म.ना.लोडी (नागपूर)*
**लोकप्रभा :** का.सं.प्रदीप वर्मा
निसर्ग अेक लहरी मॉडेल — *राजीव खांडेकर*
मी भांडकुदळ कसा झालो — *शिरीष कणेकर*
'माणिक मोती'च्या निमित्ताने — *भक्ती बर्वे इनामदार*
**लोकसत्ता :** डॉ.अरुण टिकेकर
मराठीच्या वैभवाचा अस्त — *वि.गो.कुलकर्णी*
शायर निदा फाजली — *ज्योती दाते.*
मार्क्स ते माफीया — *युनिक फीचर्स*
खरं काय, खोटं काय? (छायाचित्रांचं) — *मोहन वाघ*
मुंबईच्या गोदीतील दिवस — *पंढरीनाथ रेगे*
**लोकसाथी :** वैजनाथ भोईर
भाषाकारणाचे स्वातंत्र्योत्तर तीन तेरा — *माधव गडकरी*
सुवर्णोत्तर काळातील लता मंगेशकर — *श्रीकांत बोजेवार*
सीनेसंगीताचा बदलता चेहरा — *अभिजित देसाई*
कवी नारायण सुर्वे यांचा स्वातंत्र्याचा जाहीरनामा — *अशोक बेंडखळे*
साहित्यिका, लेखिका आणि समाजसेविका महाश्वेतादेवी — *पु.द. कोडोलीकर*
**वनराई :** मोहन धारिया
तीन परिसंवाद
पर्यावरण संकल्पना — *बाळ फोंडके, डॉ.सविता घाटे*
पर्यावरण संगोपन — *डॉ. लीला दीक्षित, राजा मंगळवेढेकर, जयंत नारळीकर, सुरेशचंद्र वारघडे, सुधाकर प्रभू*
पर्यावरण नवलाई — *निरंजन घाटे, डॉ.कांचन गंधे, नीलिमकुमार खैरे*
वसुधा : कल्पना गायकवाड
हंस पर्व (चित्रपट संस्था) — *एक रोमहर्षक इतिहास — मनोहर पुरंदरे*
**वहिनी :** विश्वास पटवर्धन
भर्तृहरी — व्यक्ति आणि वाङ्मय — *सुमती कानडे*
**विशाखा :** ह.ल.निपुणगे
साहित्य संमेलनाचे अध्यक्षपद आणि मी — *मधु मंगेश कर्णिक*
मृत्यूंजयचे दूरदर्शन — *शिवाजी सावंत*
मा. कृष्णराव — *श्रीरंग संगोराम*
सूरमय जीवन (पेटीवाले कृष्णराव मेहेंदळे) — *डॉ. मंदा खांडगे*
यशवंतराव गडाख पाटील — *सु.प्र.कुलकर्णी*
विशेष पुरवणी 'कृतार्थ' (नवलमल फिरोदिया) — *विशेष लेख*
**शतायुषी :** डॉ. अरविंद आणि आशा संगमनेरकर
घरोघरचे आजार आणि उपचार
किरकोळ आजार आणि आयुर्वेदिक उपचार — *वैद्य जोशी, वैद्य नानल*
डॉक्टरी सत्यकथा
अपुले आरोग्य अपुल्या हाती
अपघात एक असह्य आघात
**शब्दालय :** सुमती लांडे
महाराष्ट्राच्या राजकारणातली बदलती समीकरणे — *पद्मभूषण देशपांडे*
वाचक समीक्षक आणि माझे लेखन — *व.बा.बोधे*

**सहयोग :** सायमन मार्टिन या घसरणीला सुरुवात कधी झाली? — *प्रा.सदानंद वर्दे, अरुण टिकेकर, चंद्रशेखर धर्माधिकारी, विक्रम गोखले, रत्नाकर मतकरी, अविनाश धर्माधिकारी, डॉ. भालचंद्र उदगावकर, भास्कर गोळे.*
मध्यमवर्गच देश वाचवू शकेल — *कुमार केतकर*
**सत्याग्रही :** डॉ. कुमार सप्तर्षी
मऱ्हाटी रंगभूमी : एक टिपण — *संजय पवार*
आपला राष्ट्रीय गुण — *गोविंद तळवलकर*
जागतिकीकरणातला राष्ट्रवाद — *राजेन्द्र व्होरा*
राष्ट्रीय स्वप्न साकार होईल ?— *अरविंद लेले*
**सह्याद्रिनंदन :** संजय इंगुळकर
रँडचा वध — *माधव राव*
**साधना :** वसंत बापट, कुमुद करकरे, सदानंद वर्दे
भाऊसाहेबांनी आमची मनं श्रीमंत केली — *कुसुमाग्रज*
मला गवसलेले खांडेकर — *ग.प्र.प्रधान*
मिर्जा ग़ालिब — *नंदिनी आत्मसिद्ध*
भारतीय राजकारणाचे भरकटलेले तारु — *सत्यरंजन साठे, भा.ल.भोळे, ना.य.डोळे, मंगेश कुलकर्णी*
**साप्ताहिक सकाळ :** सदा डुंबरे
होरपळलेली माणसं — *अनिल अवचट*
कॅन्सरसोबत पंधरा वर्षं — *अनुराधा सोवनी*
तुरुंगातल्या बायका — *शोभा बोंद्रे*
झिंबाव्वे गोरा आणि काळा — *मिलिन्द वोकील*
**साप्ताहिक सावाना :** भरद्वाज रहाळकर
वारकरी संप्रदाय — सांस्कृतिक योगदान — *यु.म.पठाण*
सरकार वाड्याचे दिवस — *मनोहर शहाणे*
आपण अधिक संवेदनाशील झालो की निगरगट्ट? *चंद्रकांत वर्तक*
**साहित्य सूची :** मोरेश्वर नांदुरकर
मी कसा झालो? — *बाळ सामंत, एकनाथ बागूल, बाबा भांड, बाळ ज. पंडित, वि. ग. कानिटकर, हे. वि. इनामदार, मो.ग.तपस्वी, ह.मो.मराठे, सुरेश खरे, सुभाष भेंडे, माधव कानिटकर, सुधाकर प्रभू, मंगला गोडबोले, शं.ना. नवरे, अश्विनी धोंगडे, शिवराज गोर्ले, अनुराधा औरंगाबादकर.*
**साहित्य संगम :** उमाकांत वाघ
चित्रपटातले वाढते अंगप्रदर्शन कधी कमी होणार? — *उमाकांत वाघ*
डॉक्टरांची असाध्य दुखणी — *डॉ.दीपक खारकर*
**सुगंध :** सुरेखा करंदीकर
ऋतू परदेशातील — *कुमार केतकर*
ऋतूप्रमाणे आहार — *सुधा आंबेकर*
ऋतूंचे पदन्यास — *मीना गोडखिंडी*
'दास्ताना'ची दास्तान — *निशिगंधा वाड*
**सुगंध सरिता :** सदाशिव सावंत
ज्ञानेश्वरीतील गीताप्रेम — *उषा देशमुख*
दशावतार एक लोकवेद — *राजा सामंत*
**सुवासिनी :** अविनाश केळकर
पाकिस्तानातील स्त्रीजीवन — *राजीव साबडे*
एक ओंजळ सेवेची — *डॉ. मंदा खांडगे*
तिसऱ्या डोळ्याची किमया (गौतम राजाध्यक्ष) — *सुषमा आराध्ये*
प्रतिभा शाहू मोडक: एक कलात्मक अध्याय — *नंदा सुर्वे*
**सुहृद :** अरविंद ओढेकर
गर्भाशय भाड्याने देणे आहे (परिसंवाद) — *चंद्रशेखर धर्माधिकारी, डॉ.अरुण गद्रे, नंदिनी आत्मसिद्ध, डॉ. अश्विनी धोंगडे, डॉ. सुहासिनी इर्लेकर, डॉ.मंगला वरखेडे, डॉ. म.बा.*










*कुलकर्णी, विजया दीक्षित, कुसुम पटवर्धन, रमेश वैद्य*
बदलांना सामोरं जाणं अटळ आहे — *दीपा लागू*
स्त्री सर्व स्तरावर अस्वस्थ आहे — *तारा भवाळकर.*
**स्नेहश्री :** उषा दर्डा
आजची अमेरिकन गृहिणी — *प्राजक्ता देशपांडे (अमेरिका)*
माथग्रेन एक डोकेदुखी — *डॉ. शरद जोगळेकर*
**वसुंधरेचा श्रावण :** शेखर नानजकर
अरण्ययोगी — *सुरेशचंद्र वारघडे*
सागरी बेटे — *डॉ. सविता घाटे*
वनस्पती विषारी आणि विषहारी — *डॉ. रिमा साने.*
**ऋतुरंग :** अरुण शेवते
रशियातील माझे दिवस — *कुमार केतकर*
मी आणि राघववेळ — *नामदेव कांबळे*
टॉक शो म्हणजे एक सर्कस आहे (तेंडुलकरांची मुलाखत) — *अरुणा अंतरकर*
**श्री दीपलक्ष्मी :** ग. का. रायकर
माझे शत्रू वाद भांडण — *कुमार केतकर, ज्ञानेश्वर नाडकर्णी, अनंत भावे, चित्रा पालेकर इ.*
हिंडता फिरता गेलो — *अशोक नायगावकर*
पैसाळलेला मध्यमवर्ग — *निळू दामले.*

❑

नन्दा सुर्वे
'आनंद-रंग', आनंदनगर, २७/३ हिंगणे खूर्द, सिंहगडरोड, पुणे ४११ ०५१.

---

**साभार पोच**

- ❑ **आशयवेध :** डॉ.स.त्र्यं.कुल्ली, विजय प्रकाशन, नागपूर. पृष्ठे १६८
- ❑ **उचापती :** व्यं.ना. वळसंगकर, रजत प्रकाशन, औरंगाबाद. पृष्ठे ५३
- ❑ **मानसशास्त्रीय संशोधन :** डॉ. अलका वाडकर, उन्मेश प्रकाशन, पुणे. पृष्ठे ८८
- ❑ **एकनाथी भागवत :** राजाराम आफळे, गोकुळ मासिक प्रकाशन, पृष्ठे १५७
- ❑ **माझे पुढारी :** विश्वनाथ वावळे, शिवनेर प्रकाशन, मुंबई. पृष्ठे १९७
- ❑ **पाकळ्या :** नरेन्द्र वावळे, शिवनेर प्रकाशन, पृष्ठे ९६
- ❑ **नापासांची शाळा :** पु.ग.वैद्य, वेदवती र जोशी, कुमजाई प्रकाशन, पुणे. पृष्ठे ६८
- ❑ **बोरी बाभळी :** व्ही.एस.वाळवेकर, प्रिया प्रकाशन, शहापूर, बेळगाव. पृष्ठे ५२
- ❑ **दीपमाळ :** शामसुंदर मुळे, ऋचा प्रकाशन, नागपूर. पृष्ठे १२७
- ❑ **अमेरिकन लेडी :** प्रमोद जोशी, कस्तुरी प्रकाशन, धुळे. पृष्ठे ११६
- ❑ **संस्कृति आणि समाज :** वी.एम.लोणकर, सौ.विमलाबाई लोणकर, हिंगणे, पुणे. पृष्ठे ११५
- ❑ **एकांत रेघेवर :** संजीवनी बोकील, नवीन उद्योग प्रकाशन, पृष्ठे ९६










# म. सा. प. उल्लेखनीय

गेल्या काही महिन्यांत म. सा. परिषदेच्या संदर्भात अनेक उल्लेखनीय घटना घडल्या. परिषदेने हाती घेतलेल्या उपक्रमांमध्ये लक्षणीय प्रगती झाली. तर अनेक संस्था व व्यक्ती यांच्याकडून परिषदेला भरीव साहाय्य प्राप्त झाले. त्यांतील काही विशेष महत्त्वाच्या नोंदी येथे करीत आहोत.

१) आजपर्यंत परिषदेने मराठी वाङ्मयाच्या इतिहासाचे ६ खंड प्रकाशित केले. (त्यांपैकी ४ थ्या खंडाची दुसरी आवृत्ती काढण्यात आली होती.) गेल्या अनेक वर्षांपासून आवृत्ती संपल्यामुळे, अभ्यासकांची सतत मागणी असलेले ३, ४ व ५ हे खंड मिळेनासे झाले होते. या ग्रंथांच्या नवीन आवृत्ती काढण्यासाठी लागणारा निधी परिषदेकडे उपलब्ध नसल्यामुळे अभ्यासकांना निराश करावे लागत होते. केंद्रशासनाच्या म्हैसूर येथील Central Institute of Indian Languages यांच्याकडून ग्रंथ प्रकाशनासाठी साहित्य-संस्थांना अर्थसाहाय्य मिळू शकते, अशी माहिती राज्य मराठी विकास संस्थेच्या संचालक *डॉ. सरोजिनी वैद्य* यांच्याकडून मिळाली. त्यांनी त्याबद्दलची प्रपत्रेही (फॉर्म) उपलब्ध करून दिली. या संस्थेशी सतत पत्रव्यवहार करून परिषदेचे अध्यक्ष व पदाधिकारी आणि संबंधित समितीवर मराठीचे प्रतिनिधी म्हणून काम करणारे *डॉ. रमेश धोंगडे* यांनी परिषदेच्या मागणीचा पाठपुरावा केला. या सर्वांच्या प्रयत्नांना यश येऊन खंड ३,४ व ५ (दोन भाग) या चार ग्रंथांसाठी अनुदान मंजूर झाले असून अनुदानाचा पहिला हप्ता अलीकडेच प्राप्त झाला आहे. येत्या काही महिन्यांत या खंडांचे मुद्रण पूर्ण होऊन अभ्यासकांची गैरसोय दूर होईल. यथावकाश यासंबंधीची अधिक माहिती देणे शक्य होईल.

२) अमराठी भाषकांना मराठी साहित्याची माहिती इंग्रजी भाषेमधून देण्याचे आजवर अनेक प्रयत्न झाले. त्यांतील बरेचसे व्यक्तिगत स्वरूपाचे होते. मराठीसंबंधी कार्य करणाऱ्या कोणत्याही प्रातिनिधिक संस्थेकडून याबाबत काही कार्य होऊ शकले नव्हते. म.सा.परिषदेने ४-५ वर्षांपूर्वीच हे काम करण्याचे योजले होते. परिषदेच्या वाटचालीस ९० वर्षे पूर्ण झाल्याच्या निमित्ताने हे काम त्वरेने सुरू करण्यात आले. *प्रा.ग.प्र.प्रधान, प्रा.के.ज.पुरोहित* व *प्रा.गो.म.कुलकर्णी* यांची संपादक समिती व *श्री. राजेन्द्र बनहट्टी व डॉ.गं.ना. जोगळेकर* हे प्रमुख संपादक अशी नियुक्ती करण्यात आली. *'A History of Modern Marathi Literature'* हा ग्रंथ दोन भागांत प्रकाशित करण्यात येत असून त्यातील पहिल्या भागाचे प्रकाशन २५ मार्च रोजी, पुणे विद्यापीठाचे निवृत्त कुलगुरू *डॉ. वसंतराव गोवारीकर* यांच्या हस्ते करण्यात आले. या पहिल्या भागाचे *डॉ.गं.ना.जोगळेकर* (साहित्याची सामाजिक - सांस्कृतिक पार्श्वभूमी),

*प्राचार्य शिरीष चिंधडे* (काव्य), *डॉ. निशिकांत मिरजकर* (कादंबरी), *डॉ. वि. भा. देशपांडे* (नाटक) व *प्रा. के. ज. पुरोहित* (कथा) हे लेखक आहेत. उरलेल्या वाङ्मयप्रकारांचा समावेश असलेल्या दुसऱ्या भागाच्या लेखनाचे काम चालू असून यथावकाश त्याचे मुद्रण सुरू होईल. एका ज्येष्ठ संस्थेने अधिकृतपणे सिद्ध केलेल्या या इतिहासग्रंथाचे अमराठी अभ्यासकांकडून चांगले स्वागत होईल असा विश्वास वाटतो.

३) परिषदेमार्फत दिल्या जाणाऱ्या जुन्या, कमी रकमेच्या पारितोषिकांच्या निधीत भर घालण्याचा प्रयत्न परिषदेचे कार्यकर्ते सतत करीत असतात. त्याप्रमाणे अनेक नवी पारितोषिके सुरू करण्यासाठी अनेक हितचिंतक व वाङ्मयप्रेमी ठेवींच्या रूपाने देणगी देऊन परिषदेवरील विश्वास प्रकट करीत असतात. अलीकडे मिळालेल्या अशा काही देणग्या :

(अ) ख्यातनाम लेखिका *श्रीमती ज्योत्स्ना देवधर* यांनी प्रतिवर्षी एका लेखिकेस कथा किंवा कादंबरी या प्रकारांतील सर्वोत्कृष्ट साहित्यकृतीबद्दल रु. ५०००/-चा पुरस्कार देण्यासाठी परिषदेकडे रुपये पन्नास हजाराची ठेव ठेवली आहे. विशेष म्हणजे हा पुरस्कार थोर बंगाली लेखक *कै. शरच्चंद्र चट्टोपाध्याय* (शरदबाबू) यांच्या नावाने देण्यात यावयाचा आहे. एका मराठी-हिन्दी लेखिकेने दुसऱ्या भाषेतील थोर लेखकाचे स्मरण करावे यातच या पुरस्काराचे वेगळेपण आहे. हा पुरस्कार याच वर्षापासून देण्यासाठी श्रीमती ज्योत्स्ना देवधरांनी परिषदेकडे वेगळे पाच हजार रुपये दिले. नुकताच १० मार्च*ला डॉ. चंद्रकांत बांदिवडेकर* यांच्या हस्ते हा पुरस्कार *श्रीमती निर्मला देशपांडे* यांना त्यांच्या *'सलत सूर सनईचा'* या कादंबरीबद्दल समारंभपूर्वक देण्यात आला. या पहिल्या पुरस्काराचे परीक्षक म्हणून *श्री. ह. मो. मराठे* व *श्रीमती नंदा सुर्वे* यांनी काम केले.

(आ) मराठीतील थोर इतिहास संशोधक, संत साहित्याचे अभ्यासक व चरित्रकार *प्रा. न. र. फाटक* यांच्या स्मरणार्थ म. सा. परिषदेकडे प्रा. न. र. फाटक स्मृतिप्रतिष्ठानने रु. ४० हजारांची ठेव सुपूर्त केली असून या निधीच्या व्याजातून दर तीन वर्षांनी एका संशोधकास रु. १२ हजारांचे *प्रा. न. र. फाटक पारितोषिक* देण्यात यावयाचे आहे. हे पारितोषिक याच वर्षापासून देता येण्यासाठी वेगळी तरतूद करण्यात आली आहे. नुकतेच १५ एप्रिल रोजी हे पारितोषिक *डॉ. म. अ. मेहेंदळे* यांना *डॉ. चिं. ग. काशीकर* यांच्या हस्ते देण्यात आले.

(इ) संतसाहित्य व महाराष्ट्र - संस्कृती यांचे श्रेष्ठ भाष्यकार *कै. प्रा. शं. दा. पेंडसे* यांच्या जन्मशताब्दी निमित्ताने त्यांचे पुत्र (मेजर) *श्री. केशव पेंडसे* व *श्री. बलवंत पेंडसे* यांनी परिषदेस रु.१४,०००/- ठेवरूपाने दिले असून त्याच्या व्याजातून, संतसाहित्यविषयक सातत्याने व दर्जेदार लेखन केलेल्या ज्येष्ठ अभ्यासकास प्रतिवर्षी रु. १०००/- चे *प्रा. शं. दा. पेंडसे पारितोषिक* देण्यात यावयाचे आहे. येत्या २७ मेच्या परिषदेच्या ९२व्या वर्धापन दिनाच्या पारितोषिक वितरण समारंभात हे पारितोषिक प्रथमत: देण्यात येईल.

(ई) *श्री. माधव व श्री. रामकृष्ण मदाने* यांनी आपले बंधू *कै. प्रभाकर मदाने* यांच्या स्मरणार्थ थोर कवी *कै. भा. रा. तांबे* यांच्या नावाने रु.१,१००/- चे पारितोषिक देण्यासाठी परिषदेकडे रु. पंधरा हजाराची ठेव ठेवली आहे. प्रतिवर्षी एका ज्येष्ठ कवीस हा कवी *भा. रा. तांबे काव्यपुरस्कार*

देण्यात येईल. पुढील वर्षापासून (२७ मे १९९९) हा पुरस्कार देणे सुरू होईल. ७ डिसेंबर १९९७ (तांबे स्मृतिदिन) या दिवशी कै. तांबे यांच्या भावगीतांचे गायन करण्यासाठी श्री. मदाने बंधू यांनी वेगळी तरतूद केली होती. *डॉ.माधवी वैद्य* यांच्या 'अनन्वय' संस्थेच्या *राहूल घोरपडे, निलेश श्रीखंडे, ऋजुता सरोदे, मनीषा पवार व मनीषा देशपांडे* या कलाकारांनी तांबे-गीतांचा बहारदार कार्यक्रम सादर केला.

(३) मराठी प्राध्यापक संघटनेने नुकतीच परिषदेकडे रु. बारा हजाराची ठेव ठेवली असून तिच्या व्याजातून दलित साहित्याचे मर्मज्ञ समीक्षक *डॉ. भालचंद्र फडके* यांच्या गौरवार्थ दलित लेखक पुरस्कार (रु. एक हजार) प्रतिवर्षी देण्यात येणार आहे. हा पुरस्कार याच वर्षापासून देण्यासाठी मराठी प्राध्यापक संघटनेने रु.१०००/- ची वेगळी देणगी दिली आहे.

या सर्व देणगीदारांची व संबंधित संस्थांची परिषद ऋणी आहे.

(४) मागल्या पिढीतील ख्यातनाम संशोधक, संपादक व कथाकार *कै.स.आ.जोगळेकर* यांची जन्मशताब्दी समारंभपूर्वक साजरी करण्यासाठी त्यांची कन्या व मराठीतील सुप्रसिद्ध लेखिका *श्रीमती प्रतिभा काळे* यांनी परिषदेस रु.१०००/-ची देणगी दिली. १० नोव्हेंबर १९९७ रोजी, कै.जोगळेकर यांच्या १०१ व्या जन्मदिनी संस्कृत व प्राकृत भाषांचे ख्यातनाम अभ्यासक *डॉ.मो.गो.धडफळे* यांचे 'स.आ.जोगळेकर : मराठी बाण्याचा महाराष्ट्री पंडित' या विषयावर अभ्यासपूर्ण व्याख्यान झाले.

(५) परिषदेचे एक हितचिंतक व प्रसिद्ध विज्ञान-लेखक *श्री.म.ना.गोगटे* यांनी परिषदेस रु. तीन हजारांची देणगी दिली असून परिषदेस योग्य वाटेल त्या कारणासाठी या रकमेचा विनियोग करावा असे कळविले आहे.

(६) परिषदेचे एक ज्येष्ठ सभासद *श्री.ग.वि.पेठे* यांनी *योगवासिष्ठ* या ग्रंथाचे ९ खंड (एकूण मूल्य रु.३०००/-) परिषदेस भेट म्हणून दिले असून ते ग्रंथालयात वाचनासाठी उपलब्ध करण्यात आले आहेत.

द्रव्य किंवा ग्रंथरूपाने परिषदेस साहाय्य करणाऱ्या या सर्व हितचिंतकांचे मन:पूर्वक आभार. या सर्व देणग्या इतरांना अनुकरणीय ठरतील असा विश्वास वाटतो.

(७) प्रतिवर्षी २७ फेब्रुवारीस कॉन्टिनेन्टल प्रकाशन पुरस्कृत *कवी कुसुमाग्रज पुरस्कार* दिला जातो. या वर्षी हा समारंभ बालगंधर्व रंगमंदिरात जागतिक मराठी अकादमीच्या सहकार्याने आयोजित करण्यात आला. (पारितोषिक विजेता *कवी सतीश काळसेकर,* प्रकाशक- *लोकवाङ्मय प्रकाशन, मुंबई)* २७ फेब्रुवारी हा दिवस गेल्या दोन वर्षांपासून *'मराठी दिवस'* म्हणून साजरा करण्यास येत आहे. या प्रसंगी महाराष्ट्र टाइम्स चे नामवंत संपादक *श्री.कुमार केतकर* यांनी 'मराठी भाषा : कालची, आजची व उद्याची' या विषयावर मौलिक विचार व्यक्त केले. या समारंभाच्या उत्तरार्धात कुसुमाग्रज साहित्य दर्शनाचा रंगतदार कार्यक्रम *श्री. मोहनदास सुखटणकर, सौ. मंगला खाडिलकर, सौ. विनीता आपटे* व *श्री. केशव साठ्ये* यांनी सादर केला. जागतिक मराठी अकादमीचे श्री. राधाकृष्ण नार्वेकर, श्री. प्रदीप भिडे, सौ. विनीता आपटे व श्री. केशव साठ्ये यांच्या परिश्रमामुळे हा कार्यक्रम संस्मरणीय झाला.



अनुक्रमणिका






(९) अ.भा.मराठी साहित्य महामंडळाचा वर्धापन समारंभ प्रतिवर्षी मार्चमध्ये साजरा होत असतो. या वर्षी या समारंभाच्या संयोजनाची जबाबदारी म.सा.परिषदेकडे होती. ७ व ८ मार्च अशा दोन दिवशी हा समारंभ सुप्रसिद्ध समीक्षक *डॉ.व.दि.कुलकर्णी* यांच्या अध्यक्षतेखाली झाला. दि. ७ रोजी डॉ. कुलकर्णी यांचे अध्यक्षीय भाषण झाले. दि. ८ रोजी दिवसभराचे चर्चासत्र आयोजित करण्यात आले होते. *'गेल्या पन्नास वर्षांतील भारतीय साहित्य'* या महत्त्वपूर्ण विषयावरील चर्चासत्रात डॉ.निशा ढवळे, डॉ. पद्मा मेहता, डॉ.न.म.जोशी, डॉ.अ.रा.तोरो, श्रीमती अनुराधा भद्र, प्राचार्य शिरीष चिंधडे यांनी अनुक्रमे हिन्दी, गुजराती, सिंधी, कन्नड, बंगाली व भारतीय लेखकांचे इंग्रजी साहित्य या भाषांसंबंधी निबंध सादर केले; तर डॉ.श्री.दा.संगोराम, प्रा.निशिकांत ठकार, डॉ.के.पी.लेखवाणी, प्रा. लछमन हर्दवाणी, श्री. विलास गिते, डॉ. अपर्णा झा, श्री. विरुपाक्ष कुलकर्णी, सौ. मीना वांगीकर, डॉ.के.एस्. हेगडे, प्रा. मीनाक्षी रायकर इत्यादींनी चर्चेत भाग घेतला. चर्चासत्राचे उद्घाटन *प्रा.ग.प्र.प्रधान* यांनी केले. सकाळच्या चर्चासत्राचे अध्यक्ष *डॉ.चंद्रकांत बांदिवडेकर* होते तर दुपारच्या चर्चासत्राचे अध्यक्ष *प्रा.के.ज.पुरोहित* होते. शेवटी समारोपाचे भाषण *डॉ.व.दि.कुलकर्णी* यांनी केले. श्रोत्यांच्या भरगच्च उपस्थितीत दोन दिवसांचा हा समारंभ साजरा झाला.

**गं. ना. जोगळेकर**, कार्याध्यक्ष

---

**साभार पोच**

- ❑ **शिदोरी :** ना.गो.पतंगे, विदर्भ लेखक संघ प्रकाशन, पृष्ठे ६४
- ❑ **वंचिता :** विद्यादेवी परचुरे, मॅजेस्टिक प्रकाशन, मुंबई. पृष्ठे १२४
- ❑ **शब्दकुंज :** गजानन घारपुरे, साहित्य कलायात्री प्रकाशन, पुणे. पृष्ठे ४०
- ❑ **सर्वांगसोहळा:** शं.श्री.वाशीकर, वाग्विलास प्रकाशन, औरंगावाद. पृष्ठे ३६
- ❑ **हा छंद गझलांचा :** डॉ.अजीज नदाफ, एकता प्रकाशन, सोलापूर. पृष्ठे ५२
- ❑ **जाऊ अमृताचे गावा :** श्री.दि.इनामदार, कीर्ती प्रकाशन, औरंगाबाद. पृष्ठे ४८
- ❑ **दीनमित्र मुकुन्दराव पाटील :** स्वप्नील सहस्त्रबुद्धे, औरंगाबाद. पृष्ठे २२०
- ❑ **स्नेह सोबती :** सुनिल सावंत, वि.ग.भागवत, सावंतवाडी. पृष्ठे १२८
- ❑ **जिगसॉ :** रामदास भटकळ, राजहंस प्रकाशन, पुणे. पृष्ठे २४२
- ❑ **साहित्य शास्त्रातील अध्यात्म संकल्पना :** डॉ.म.दा.बरसावडे, विजया ब्रह्मानंद पराडकर, फलटण. पृष्ठे १५०
- ❑ **साठोत्तरी मराठी कविता :** रा.ग.जाधव, साकेत प्रकाशन, औरंगाबाद, पृष्ठे १८५
- ❑ **वळणावरून :** सौ.सुषमा गरुड. प्रकाशक सौ.य.वा.सोनार, अमळनेर. पृष्ठे ७९



अनुक्रमणिका






# म. सा. प. कार्यवृत्त

ऑक्टोबर ९७ ते मार्च ९८ या सहा महिन्यांत परिषदेतर्फे अनेक साहित्यिक कार्यक्रमांचे आयोजन करण्यात आले होते.

सोमवार *दिनांक ६ ऑक्टोबर* ९७ रोजी म.म.द.वा. पोतदार पारितोषिक *डॉ. अशोक एरंडे* यांच्या 'सत्यशोधक मुकुंदराव पाटील' या ग्रंथास ७०व्या अ.भा.म. साहित्य संमेलनाचे अध्यक्ष *श्री. ना. सं. इनामदार* यांच्या हस्ते देण्यात आले.

गुरुवार *दिनांक ९ ऑक्टोबर* रोजी कै. विद्याधर पुंडलीक पारितोषिक *डॉ. चंद्रकांत वर्तक* यांच्या 'वळणावरचे साकव' या व्यक्तिचित्रात्मक ग्रंथास ७१ व्या अ.भा.म. साहित्य संमेलनाचे अध्यक्ष *प्रा.द.मा.मिरासदार* यांच्या हस्ते देण्यात आले. दोन्ही कार्यक्रमांचे सूत्रसंचालन कार्यवाह *डॉ. कल्याणी दिवेकर* यांनी केले तर *रत्नाकर कुलकर्णी* यांनी आभार मानले.

सोमवार *दिनांक २७ ऑक्टोबर* ९७ रोजी कै. व.ह.गोळे स्मृतिदिनानिमित्त नाट्यसंगीताचा विशेष कार्यक्रम *श्री. रवींद्र* व *सौ. वंदना घांगुर्डे* यांनी सादर केला.

मंगळवार *दिनांक २८ ऑक्टोबर* ९७ रोजी म.सा.प. व विविध वाङ्मयीन मंडळे यांच्या संयुक्त विद्यमाने कथाकथनाचा विशेष कार्यक्रम आयोजित करण्यात आला होता. या कार्यक्रमात सर्वश्री. *हेमा धारवाडकर* (साहित्यप्रेमी भगिनी मंडळ) *मधुसूदन घाणेकर* (काव्यशिल्प) *नीलिमा गुंडी* (शब्दमित्र) *प्रतिभा पाठक* (रंगत संगत प्रतिष्ठान) यांनी भाग घेतला.

शुक्रवार *दिनांक ७ नोव्हेंबर* ९७ रोजी कवी केशवसुत यांच्या स्मृतिदिनाच्या निमित्ताने महामंडळाचे अध्यक्ष *डॉ. सुधीर रसाळ* यांचे 'केशवसुतांची कविता : एक आकलन' या विषयावर भाषण झाले.

शनिवार *दिनांक ८ नोव्हेंबर* ९७ रोजी, परळी वैजनाथ येथे एप्रिल ९८ मध्ये संपन्न होत असलेल्या ७१ व्या अ.भा.म. साहित्य संमेलनाचे अध्यक्ष ज्येष्ठ विनोदी कथाकार *प्रा. द. मा. मिरासदार* यांचा प्रकट सत्कार म.सा.प.चे अध्यक्ष *श्री. राजेंद्र बनहट्टी* यांच्या अध्यक्षतेखाली झाला. *सौ. सुनेत्रा मंकणी, प्राचार्य बाळ गाडगीळ* व पुणे विद्यापीठाच्या मराठी विभागाचे प्रमुख *डॉ.नागनाथ कोत्तापल्ले* यांची द.मा. मिरासदार यांच्या गौरवपर भाषणे झाली. प्रास्ताविक व स्वागत कार्याध्यक्ष *डॉ. गं.ना. जोगळेकर* यांनी केले. सूत्रसंचालन कार्यवाह *रत्नाकर कुलकर्णी* यांनी केले तर आभार *डॉ. कल्याणी दिवेकर* यांनी मानले. प्रथेनुसार परिषदेने, नियोजित संमेलनाध्यक्षांचा प्रथम प्रकट सत्कार केल्यानंतर अनेक साहित्यिक संस्था, प्रकाशन संस्था व व्यक्तींनी द.मा. मिरासदारांचा हार व पुष्पगुच्छ देऊन सत्कार केला.



अनुक्रमणिका

बुधवार *दिनांक १९ नोव्हेंबर* ९७ रोजी कै. स.आ. जोगळेकर यांच्या जन्मशताब्दीनिमित्त परिषदेने डॉ.मो.गो. धडफळे यांचे 'मराठी बाण्याचा 'महाराष्ट्री-पंडित' या विषयावर भाषण आयोजित केले होते. या विशेष कार्यक्रमात कै. जोगळेकर यांच्या कन्या श्रीमती प्रतिभा काळे यांनी वडिलांच्या आठवणी सांगितल्या. कै. जोगळेकर यांच्या 'अहिल्या व इतर कथा' (कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे) व 'सह्याद्री' (शुभदा सारस्वत) या पुस्तकांच्या द्वितीय आवृत्तींचा प्रकाशन समारंभही या वेळी झाला.

शनिवार *दिनांक २९ नोव्हेंबर* ९७ रोजी कवी माधव जूलियन यांच्या स्मृतिदिनानिमित्त प्रथितयश व नवोदित कवी-कवयित्रींचे कविसंमेलन आयोजित करण्यात आले होते. सूत्रसंचालन *अंजली कुलकर्णी* यांनी केले.

मंगळवार *दिनांक २ डिसेंबर* ९७ रोजी कै. आहिताग्नि राजवाडे स्मृतिव्याख्यान आयोजित करण्यात आले होते. यावेळी *डॉ. सदानंद मोरे* यांचे 'आहिताग्नि राजवाडे आणि हिंदूधर्म' या विषयावर भाषण झाले.

शनिवार *दिनांक ६ डिसेंबर* ९७ रोजी कै. ल.कृ. वष्ट जन्मशताब्दी कार्यक्रमांतर्गत ख्यातनाम लेखक व शिक्षणतज्ज्ञ *डॉ. द.न. गोखले* यांचा सत्कार सुप्रसिद्ध विचारवंत *प्रा.मे.पुं.रेगे* यांच्या हस्ते करण्यात आला. यावेळी गोखले यांच्या गौरवपर *डॉ. व. दि. कुलकर्णी* व *प्रा.स.ह. देशपांडे* यांची भाषणे झाली. हा सत्कार समारंभ म.सा.प. व सोऽहम् प्रकाशन यांच्या संयुक्त विद्यमाने झाला.

रविवार *दिनांक ७ डिसेंबर* ९७ रोजी भा.रा.तांबे यांच्या स्मृतिदिनानिमित्त 'अनन्वय' या संस्थेने कै. तांबे यांच्या निवडक कविता बहारदारपणे सादर केल्या.

यंदा 'मासिक मनोरंजन'कार का.र.मित्र व्याख्यानमालेत आचार्य प्र.के.अत्रे यांच्या जन्मशताब्दीनिमित्त त्यांच्या जीवनकार्याविषयी दहा भाषणे आयोजित करण्यात आली होती. *दिनांक ११ डिसेंबर ९७ ते २० डिसेंबर* ९७ पर्यंत चाललेल्या या व्याख्यानमालेला रसिक श्रोत्यांनी भरपूर प्रतिसाद दिला. व्याख्यानमालेत खालीलप्रमाणे भाषणे झाली.

| क्र. | दिवस व तारीख | विषय | वक्ते |
|---|---|---|---|
| १ | गुरुवार ११/१२/९७ | 'कवी व विडंबनकार अत्रे' | डॉ. अश्विनी धोंगडे |
| २ | शुक्रवार १२/१२/९७ | 'शिक्षक अत्रे' | प्रा.शरद वाघ |
| ३ | शनिवार १३/१२/९७ | 'पत्रकार अत्रे' | श्री. माधव गडकरी |
| ४ | रविवार १४/१२/९७ | 'वक्ता अत्रे' | प्रा.राम शेवाळकर |
| ५ | सोमवार १५/१२/९७ | 'नाटककार अत्रे' | प्रा. माधव वझे |
| ६ | मंगळवार १६/१२/९७ | 'चित्रपटकार अत्रे' | श्री. बापू वाटवे |
| ७ | बुधवार १७/१२/९७ | 'विनोदकार अत्रे' | श्री. शरद तळवलकर |
| ८ | गुरुवार १८/१२/९७ | 'कथाकार अत्रे' | श्री. राजेंद्र बनहट्टी |

| | | | |
|---|---|---|---|
| ९ | शुक्रवार १९/१२/९७ | 'समीक्षक अत्रे' | प्रा.रा.ग.जाधव |
| १० | शनिवार २०/१२/९७ | 'संयुक्त महाराष्ट्राचे निर्माते अत्रे' | डॉ. गं.ना. जोगळेकर. |

ही शारदीय व्याख्यानमाला यशस्वी करण्यासाठी परिषदेचे सर्व पदाधिकारी कार्याध्यक्ष - गं.ना. जोगळेकर, कोषाध्यक्ष - ना.गो.जोशी, कार्यवाह - राजा फडणीस, कल्याणी दिवेकर, रत्नाकर कुलकर्णी, पत्रिका संपादक - ह.ल. निपुणगे, कार्यकारी मंडळ सदस्य - प्रमोद ओक व शंतनु चिंधडे यांचे विशेष परिश्रम कारणीभूत झाले.

गुरुवार *दिनांक* २५/१२/९७ रोजी श्री. म. माटे स्मृतिदिनानिमित्त कार्यकारी मंडळ सदस्य *श्री. हरी नरके* यांचे 'सावित्रीबाई फुले : नवीन प्रकाशात आलेले पैलू' या विषयावर भाषण झाले.

बुधवार दि. *१४ जानेवारी* १९९८ ला ६१ व्या वर्षात पदार्पण केल्याबद्दल श्री. राजेंद्र बनहट्टी, अध्यक्ष, म.सा.प., यांचा सत्कार ग.प्र. प्रधान यांच्या हस्ते करण्यात आला. त्याचवेळी डॉ. सौ. वसुंधरा बनहट्टी यांचाही सत्कार करण्यात आला.

रविवार *दि. १८ जानेवारी* १९९८ ला कै. वि. द. घाटे स्मृतिव्याख्यान - डॉ. शंकरराव कदम, पंढरपूर यांचे 'कर्मवीर विठ्ठल रामजी शिंदे : जीवन व साहित्य' या विषयावर व्याख्यान झाले.

सोमवार *दिनांक १९ जानेवारी* १९९८ ला कै. चिं. वि. जोशी पारितोषिक वितरण समारंभ झाला. हस्ते श्री. राजेंद्र बनहट्टी, अध्यक्ष, म. सा. प., पुणे परीक्षकातर्फे निवेदन प्रा. वसंत मिरासदार, कॉन्टिनेन्टल प्रकाशन पुरस्कृत हे पारितोषिक श्री. बाळकृष्ण देव यांच्या 'हास्यकथा' या पुस्तकाला देण्यात आले. सौ. अनघा देशपांडे, आरती प्रकाशन, डोंबिवली यांना पारितोषिक विजेते प्रकाशनाचे पारितोषिक देऊन गौरविण्यात आले.

शुक्रवार *दि. २७ फेब्रुवारी* १९९८ ला महाराष्ट्र साहित्य परिषद व जागतिक मराठी अकादमी यांच्या संयुक्त विद्यमाने कविश्रेष्ठ कुसुमाग्रज यांचा वाढदिवस बालगंधर्व रंगमंदिर, पुणे येथे साजरा करण्यात आला. कवी सतीश काळसेकर यांच्या 'विलंबित' या कवितासंग्रहाला कॉन्टिनेन्टल प्रकाशन पुरस्कृत कवी कुसुमाग्रज पारितोषिक महाराष्ट्र टाइम्सचे संपादक श्री. कुमार केतकर यांच्या हस्ते देण्यात आले. प्रकाशनासाठी असलेले पारितोषिक लोकवाङ्मय गृह प्रकाशन, मुंबई यांना देण्यात आले.

बुधवार *दि. ४ मार्च* १९९८ दिवाळी अंक पारितोषिक वितरण ७१ व्या अ.भा.म. साहित्य संमेलनाचे अध्यक्ष प्रा. द. मा. मिरासदार यांच्या हस्ते झाले. त्यात खालील दिवाळी अंकांना पारितोषिके दिली. अ. स. गोखले स्मृत्यर्थ *रत्नाकर पारितोषिक* (रु. १०००/-) तुम्ही आम्ही आपण सगळे — संपादक अविनाश धर्माधिकारी, श्री. चंद्रकांत शेवाळे (संपादक ग्रहांकित) पुरस्कृत तीन पारितोषिके : *विविध ज्ञानविस्तार*कर्ते रावसाहेब










मोरमकर पारितोषिक (रु. १०००/-) निसर्गसेवकचा 'अभिजात' - संपादक स्मिता पटवर्धन, *मासिक मनोरंजन*कार का. र. मित्र पारितोषिक (रु. १०००/-), महाराष्ट्र टाईम्स — संपादक कुमार केतकर, *शं. वा. किर्लोस्कर* यांचे स्मरणार्थ पारितोषिक (रु. १०००/-) कलासागर — संपादक विलास गुजर व इतर, धूमधमाल —– संपादक सुभाष इनामदार, सर्वोत्कृष्ट कथेसाठी कै. दि. अ. सोनटक्के पारितोषिक रु. ५००/- — नीता गद्रे यांना, सर्वोत्कृष्ट लेखासाठी अनंत काणेकर पारितोषिक — रु. २००/-, 'विशाखा' या दिवाळी अंकातील 'आत्मबोली' या ललितलेखासाठी शीला निपुणगे यांना पारितोषिक देण्यात आले.

स्पर्धेचे परीक्षक म्हणून डॉ. वि.भा. देशपांडे, सौ. शशिकला उपाध्ये आणि श्री. राजा फडणीस यांनी काम केले.

सोमवार *दि. ९ मार्च* १९९८ ला कविवर्य यशवंत पारितोषिक श्री. प्रकाश होळकर यांच्या 'कोरडे नक्षत्र' (पॉप्युलर प्रकाशन, मुंबई) या कवितासंग्रहाला प्रा. रा. ग. जाधव यांच्या हस्ते देण्यात आले. कविवर्य यशवंत यांच्या जन्मशताब्दीचे हे वर्ष आहे.

मंगळवार *दि. १० मार्च १९९८* ला श्रीमती निर्मला देशपांडे यांच्या 'सलत सूर सनईचा' या कादंवरीला श्री. चंद्रकांत वांदिवडेकर यांच्या हस्ते श्रीमती ज्योत्स्ना देवधर पुरस्कृत कै. शरच्चंद्र चट्टोपाध्याय पुरस्कार समारंभपूर्वक देण्यात आला.

शुक्रवार *दि. २० मार्च* १९९८ ला बा. सी. मर्ढेकर स्मृतिदिनानिमित्त निमंत्रितांचे व नवोदितांचे कविसंमेलन म.सा.प. च्या पटवर्धन सभागृहात आयोजित करण्यात आले.

**सोनई शाखा**

म.सा.प.च्या सोनई शाखेमार्फत *दि. ३ व ४ नोव्हेंबर* ९७ रोजी दोन कविसंमेलने आयोजित करण्यात आली होती. या कविसंमेलनात सर्वश्री रामदास फुटाणे, अशोक नायगावकर, नारायण सुमंत, प्रकाश होळकर, सतीश पिंपळगावकर, फ.मु.शिंदे, प्रकाश पाठारे व प्रकाश घोडके आदींनी भाग घेतला.

दोन्ही कविसंमेलनांना रसिक मोठ्या संख्येने उपस्थित होते. उपस्थितांमध्ये मा. शरद पवार, मधुकर पिचड, छगन भुजबळ, मदन बाफना, यशवंतराव गडाख पाटील आदी राजकीय क्षेत्रातील मंडळीही होती. पहिल्या कविसंमेलनाचे सूत्रसंचा*लन फ.मु.शिंदे* यांनी केले तर दुसऱ्या कविसंमेलनाचे *रामदास फुटाणे* यांनी केले. उपस्थितांचे आभार कार्यवाह *नामदेवराव* दे*साई* यांनी मानले.

**धुळे शाखा**

म.सा.प.च्या धुळे शाखेने खालील दोन कार्यक्रम आयोजित केले.

१) कै. डॉ. अनंतराव पाटील स्मृतिदिन *: दिनांक ३१ ऑक्टोबर* रोजी खानदेशचे प्रतिभावंत लेखक, कथाकार *कै. डॉ. अनंतराव पाटील* यांच्या स्मृतिदिनानिमित्त ग्रामीण साहित्य चळवळीचे भाष्यकार सुप्रसिद्ध लेखक *डॉ. आनंद यादव* यांचे 'मराठी ग्रामीण साहित्य' या विषयावर व्याख्यान झाले. कार्यक्रमाच्या अध्यक्षस्थानी कविवर्य *प्रा. पुरुषोत्तम पाटील* होते.

२) कै. डॉ.शां.रा.देशपांडे स्मृतिदिन : *दिनांक २४ जानेवारी ९८* रोजी *कै. डॉ. शांताराम राजाराम उर्फ भाऊ देशपांडे* यांच्या स्मृतिदिनानिमित्त व संत मुक्ताबाई यांच्या समाधीसप्तशताब्दीचे औचित्य साधून *डॉ. सुहासिनी इर्लेकर* (बीड) यांचे 'संत मुक्ताबाई' या विषयावर व्याख्यान झाले. कार्यक्रमाच्या अध्यक्षस्थानी कविवर्य *प्रा. पुरुषोत्तम पाटील* होते.

३) 'दलित रंगभूमी' या विषयावर व्याख्यान : *दि. ७ फेब्रवारी* १९९८ रोजी म.सा.प. धुळे शाखा आणि गरुड वाचनालय, सांस्कृतिक विभाग यांच्या वतीने 'दलित रंगभूमी' या विषयावर *प्रा. दत्ता भगत*, मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद यांचे व्याख्यान *प्राचार्य जे. जी. खैरनार* यांचे अध्यक्षतेखाली संपन्न झाले. पाहुण्यांचे स्वागत *प्रा. भगवान ठाकूर* यांनी केले तर पाहुण्यांचा परिचय *प्रा. अर्चना होतकर* यांनी करून दिला. तर आभार *प्रा. बी.बी. महाजन* यांनी मानले. या कार्यक्रमप्रसंगी मा. दशरथ तात्या पाटील यांचा सत्कार 'कृतज्ञतापुरस्कार' मिळाल्याबद्दल प्रा. दत्ता भगत यांचे हस्ते करण्यात आला. या कार्यक्रमाला रसिकवर्ग बहुसंख्येने उपस्थित होता.

**इस्लामपूर शाखा**

परिषदेचे आजीव सदस्य डॉ. विवेक देशपांडे, इस्लामपूर यांचे प्रथम स्मृतिदिनानिमित्त दैनिक तरुण भारत, सोलापूरचे संपादक *श्री. विवेक घळसासी* यांचे 'गरज संवादाची' या विषयावर दिनांक *३१ मार्च* १९९८ रोजी व्याख्यान झाले. स्वागत, प्रास्ताविक व पाहुण्यांचा सत्कार शाखेचे अध्यक्ष प्रा. शामराव पाटील यांनी केला. या वेळी डॉ. विवेक देशपांडे यांना प्रा. शैला सायनाकर, श्रीमती निर्मला पेठकर आणि श्रीमती इंदुमती पाटणकर यांनी श्रद्धांजली वाहिली. प्रमुख पाहुण्यांचा परिचय प्रा. डॉ. मंगल कोकाटे यांनी करून दिला. कार्याध्यक्ष प्राचार्य शरद भोसले यांनी सूत्र संचलन केले व आभार मानले. या व्याख्यानासाठी रसिक स्त्री पुरुषांची लक्षणीय उपस्थिती होती.

**उल्हासनगर शाखा**

*१८ जानेवारी* ९८ रविवार रोजी मराठी निबंध स्पर्धा घेण्यात आली; इ. ८ वी ते १० वी. पहिला गट, ११ वी व १२ वी दुसरा गट, महाविद्यालयीन विद्यार्थी व पदवीधर (खुली) तिसरा गट. असे गट पाडून त्यातून प्रत्येकी दोन स्पर्धकांचे निबंधांना प्रथम व द्वितीय पारितोषिक देण्याचे निश्चित करण्यात आले होते. स्पर्धेसाठी शाळा कॉलेजातील विद्यार्थ्यांनी उत्फूर्त साथ दिली.

*१ फेब्रुवारी* ९८ रोजी प्रसिद्ध रहस्य कथाकार मा. श्री. सुहास शिरवळकर यांची मुलाखत श्री. सुरेश देशपांडे (अध्यक्ष म. सा. प. डोंबिवली शाखा) यांनी घेतली. कार्यक्रम कालिका कलामंडळ हॉल, उल्हासनगर येथे सायंकाळी ७.०० ते ९.०० या वेळात ५०-६० रसिक श्रोत्यांच्या उपस्थित झाला. याच प्रसंगी विनोदी लेखक श्री. बाळकृष्ण देव यांना चि. वि. जोशी पुरस्कार मिळाल्याबद्दल झाल श्रीफळ देऊन मा. श्री. प्र. अ. संत यांचे शुभहस्ते सत्कार करण्यात आला.

२९ *मार्च* ९८ रविवार या दिवशी उल्हासनगर शाखेचा वर्धापन दिन साजरा करण्यात

आला.

*१८ जानेवारी* ९८ रोजी घेतलेल्या निबंध स्पर्धेतील यशस्वी स्पर्धेतील यशस्वी स्पर्धकांना मा. श्री. मनोहरजी गावडे (अध्यक्ष सिंध महाराष्ट्रीय समाज) यांचे हस्ते पारितोषिक देण्यात आली.

वर्धापन दिनाच्या कार्यक्रमाप्रसंगी म.सा.प. उल्हासनगर शाखेच्या कार्यवाह श्रीमती कुमुद अडगुळकर यांच्या कथासंग्रहाचे प्रकाशन सौ. रेखा मैड (प्राध्यापिका आटस्‌-कॉमर्स कॉलेज, अंबरनाथ) यांच्या शुभहस्ते करण्यात आले. सौ. कढणे यांनी कथासंग्रहावर समीक्षात्मक आपले विचार मांडले. सौ. लोटलीकर यांनी त्यातील एका कथेचे भावपूर्ण वाचन केले.

सौ. मैड यांनी आपल्या भाषणात कथांचा संदर्भ देत लेखिकेच्या गुणांचे कौतुक केले आणि मार्गदर्शनही केले. या कथासंग्रहाला विनोदी लेखक श्री. वि. आ. बुवा यांनी प्रस्तावना लिहिली आहे. या प्रसंगी ते विशेष अतिथी म्हणून उपस्थित होते.

म. सा. प. उल्हासनगर शाखेचे अध्यक्ष श्री. शिवराम परब यांनी आपल्या भाषणात कॅप्टन कपिल सदानंद पवार यांनी लिहिलेल्या आपल्या पाच पुस्तकांचा संच शाखेस भेट दिल्याबद्दल त्यांचे आभार मानून लवकरच त्यांच्या नवीन पुस्तकाचे प्रकाशन आपल्या शाखेच्या वतीने करण्यात येणार असल्याचे जाहीर केले.

कार्यक्रमाच्या प्रारंभी शाखेचे कार्यवाह श्री. प्र. ना. चौधरी यांनी शाखेच्या कार्याचा वृत्तांत देला. शाखेच्या कार्याध्यक्ष सौ. शेकटकर यांनी उपस्थितांचे आभार मानले.

**श्री. रत्नाकर कुलकर्णी,** कार्यवाह, म.सा.प.

---

## महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ३०.

### कार्यकारी मंडळ (१ एप्रिल ९८ ते ३१ मार्च २००१)

**अध्यक्ष :** श्री. राजेंद्र बनहट्टी
**उपाध्यक्ष :** १. डॉ. आनंद यादव २. डॉ. सरोजिनी वैद्य, मुंबई. ३. प्रा. शिवाजीराव भोसले, फलटण.
**कार्याध्यक्ष :** डॉ. गं. ना. जोगळेकर
**प्रमुख कार्यवाह :** श्री. राजा फडणीस
**कोषाध्यक्ष :** श्री. रत्नाकर कुलकर्णी
**पत्रिका संपादक :** श्री. ह. ल. निपुणगे
**स्थानिक कार्यवाह :** डॉ. वि. भा. देशपांडे (स्वीकृत)
श्री. प्रमोद आडकर (पुणे महानगरपालिका)
**पुण्याबाहेरील कार्यवाह :** श्री. प्रभाकर संत (कल्याण)

**सभासद**
डॉ. कल्याणी दिवेकर (पुणे महानगरपालिका)
डॉ. अंजली सोमण (पुणे महानगरपालिका)
डॉ. वीणा देव (पुणे महानगरपालिका)
डॉ. अश्विनी धोंगडे (पुणे महानगरपालिका)
डॉ. अरविंद संगमनेरकर (पुणे महानगरपालिका)
डॉ. शंतनु चिंधडे (पुणे महानगरपालिका)
श्री. रंगा मराठे (पुणे महानगरपालिका)
डॉ. अरविंद लेले (पुणे महानगरपालिका)
श्री. अरविंद भुजबळ (पुणे जिल्हा)
श्री. नारायण शिरसाळे (जळगाव जिल्हा)
प्रा. ओमप्रकाश होळीकर (धुळे जिल्हा)
श्री. प्रकाश होळकर (नाशिक जिल्हा)
श्री. नामदेवराव देसाई (अहमदनगर जिल्हा)
डॉ. ल. रा. नसिराबादकर (कोल्हापूर जिल्हा)
प्रा. शामराव पाटील (सांगली-सातारा जिल्हा)
प्रा. श्रीराम पुजारी (सोलापूर)
श्री. पद्माकर शिरवाडकर (ठाणे जिल्हा-स्वीकृत)
श्री. माधव कोंडविलकर (सिंधुदुर्ग, रायगड, रत्नागिरी जिल्हे)



अनुक्रमणिका






# साभार पोच

- **शतकाच्या उंबरठ्यावर :** नीलम माणगावे, मनोदय प्रकाशन, पुणे. पृष्ठे ७९.
- **उगवले नारायण :** इंद्रजित भालेराव, पृष्ठे ३९.
- **एकावनी :** आशा भिडे, श्री.वि.गंधे, पृष्ठे ६४.
- **मावळतीच्या कविता :** रा.ग.जाधव, मानसन्मान प्रकाशन, पुणे, पृष्ठे ६४.
- **मन:सागरातील शिंपले :** सौ. कौमुदी गोडबोले, प्रदीप मुळे, नागपूर. पृष्ठे ५४.
- **मारवा :** मा. कृ. पारधी, मानसन्मान प्रकाशक, पुणे. पृष्ठे ८०.
- **अग्निफुले :** साधना नागपुरे, पृथ्वी प्रकाशन पुणे, पृष्ठे ६४.
- **मन पाखरू पाखरू :** सौ. शोभा शेदरीकर, संजय पुराणिक, पुणे. पृष्ठे ६४.
- **मन:सागरातील शिंपले :** सौ.कौमुदी गोडबोले, प्रदीप मुळे, नागपूर. पृष्ठे ५४.
- **लागवड टरबूज, कलिंगड, काकडी :** वि.ग.राऊल, सन पब्लिकेशन्स, पुणे. पृष्ठे १६७.
- **विचारशलाका :** संपा.प्रा.नागोराव कुंभार, कैलाश पब्लिकेशन्स, औरंगाबाद, पृष्ठे १५४
- **फिरस्त् :** अजित मिणेकर, प्रकाशक सलोनी मिणेकर, इचलकरंजी. पृष्ठे ६९.
- **सुखाचा परिमळ :** निर्मलकुमार फडकुले, प्रकाशक बाबुराव मैदर्गीकर, सोलापूर. पृष्ठे १६७.
- **फिलर :** मंगेश विश्वासराव, प्रसाद प्रकाशन, मुंबई. पृष्ठे १२०.
- **स्त्रीदर्शन :** सौ. नीलम माणगावे, पुणे. पृष्ठे ११४.
- **डायरी :** सौ. नीलम माणगावे, पुणे. पृष्ठे १६८.
- **सायरनचे शहर :** अरुण काळे, नाशिक. पृष्ठे ७८.
- **भुलाई :** प्रतिमा इंगोले, कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे. पृष्ठे ९६.
- **बल ज्ञानेश्वरी :** ना.द.कशाळकर, अरुणा कशाळकर, मुंबई. पृष्ठे ९३.
- **झुंबर :** प्रकाश गव्हाणे, ज्ञानेश्वर कुलकर्णी, भोसरी. पृष्ठे ५०.
- **प्रयाण :** सानिया, ज्ञानदा पब्लिकेशन्स, पुणे. पृष्ठे २५६.
- **नायिका :** रेखा देशपांडे, श्रीविद्या प्रकाशन, पुणे. पृष्ठे २६५.

**इंद्रायणी साहित्य, पुणे**

- **अक्षर सांगते स्वभाव :** मधुसूदन घाणेकर, पृष्ठे ६८
- **शेवण्या पिपुशा :** सुमेधा देसाई, पृष्ठे १११
- **चित्रंगी :** सुमेधा देसाई, पृष्ठे ८९

अनुक्रमणिका

कॉन्टिनेन्टल प्रकाशन पुरस्कृत

कवी कुसुमाग्रज पारितोषिक वितरण - जागतिक मराठी अकादमी व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांच्या संयुक्त विद्यमाने (दि. २७.२.९८) बालगंधर्व रंगमंदिर, पुणे.




डावीकडून परीक्षिका हेमा लेले, अरुणा ढेरे, कुमार केतकर (संपादक महाराष्ट्र टाइम्स, मुंबई) यांचे हस्ते स्वीकारताना कवी सतीश काळसेकर काव्यसंग्रह 'विलंबित' प्रकाशक लोकवाङमय गृह प्रकाशन, मुंबई.

Registered with the Registrar of Newspapers for India Under No. 6398/57



▲ ७१ व्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्ष प्रा.द.मा. मिरासदार यांचा पहिला प्रकट सत्कार हस्ते श्री. राजेंद्र बनहट्टी अध्यक्ष, म.सा.प., सोबत सौ. सुनंदा मिरासदार आणि मध्यभागी श्री. राजा फडणीस, प्रमुख कार्यवाह, म.सा.प. पुणे

▼ प्रा.द.मा. मिरासदार यांचा सत्कार करताना परिषदेचे कार्यवाह श्री. रत्नाकर कुलकर्णी



अनुक्रमणिका